


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








अनुक्रम



मुखपृष्ठ – श्याम ~~जोशी~~ देशपांडे

मुखपृष्ठावरील पद्य – 'बहिणाईची गाणी' (बहिणाबाई चौधरी) पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. ३री आ. १९७८ पृ. ३ वरून

---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २१८७)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरण पृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी – मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ पुणे - २.

# अक्कलवंताला गरज नसते.

हल्ली वर्तमानपत्रांतून मराठी भाषेच्या वापराबद्दल बरेच काही काही लिहून येत असते. हा सारा मजकूर वाचकांच्या पत्रांच्या स्वरूपात अथवा स्वतंत्र स्फुट लेखाच्या स्वरूपात असतो. त्यात कोणी टी.व्ही. वरील निवेदनाच्या उच्चारणातील चुकांबद्दल नाराजी व्यक्त केलेली असते; कोणी रस्त्यांवरील जाहिरातींच्या अशुद्ध भाषेबद्दल तक्रार केलेली असते. एखादा वाचक शाळांतील इंग्रजी माध्यमाविरुद्ध असमाधान व्यक्त करताना आढळतो तर दुसरा हिंदीच्या आक्रमणाविरुद्ध आवाज उठवतो. तर आणखी तिसरा कोणी हिंदी, इंग्रजी शब्दांना मराठी पर्याय सुचवून भाषाशुद्धीच्या चळवळीची आठवण करून देतो. कोणी पाठ्यपुस्तकातील चुकांची (मोजदाद करतो तर कोणी प्रश्न-पत्रिकांच्या भाषेतील चुकांची) यादी देतो. हे सर्व पाहता मराठीबद्दल अभिमान बाळगून तिच्या शुद्धतेला जपणारांची संख्या बरीच मोठी आहे हे लक्षात येते आणि समाधानही वाटते.

या सर्व भाषाप्रेमींच्या तक्रारींमध्ये तथ्य आहे यात शंकाच नाही. **भाषा आणि जीवन** मध्ये याच स्वरूपाचे अनेक लेख आतापर्यंत प्रसिद्ध झाले आहेत. आणि **भाषा आणि जीवन** या तक्रारी करणाऱ्यांशी सहमतही आहे. पण या तक्रारी अरण्यरुदन तर ठरत नाहीत ना अशी शंका मनात घर करू लागली आहे.

या तक्रारी किती लोक वाचतात, कोणते लोक वाचतात, किती लोकांच्या मनात त्या ठसतात, किती लोक प्रत्यक्ष कृतीने त्यांना प्रतिसाद देतात, हा सगळा संशोधन करण्याचा विषय आहे. सकृद्दर्शनी तर असे दिसते की, तक्रार करणारे मूठभर लोक तक्रार करत राहतात, आणि चुका करणारे लोक चुका करत राहतात. या लोकांपर्यंत या तक्रारी जाऊन पोहोचतच नाहीत. महाविद्यालयातील वाढत्या गैरहजेरीबद्दल प्राध्यापक सात्त्विक संतापाने बोलत राहतात आणि त्यांचे बोलणे बिचारे प्रामाणिकपणे हजर राहणारे विद्यार्थी निमूटपणे ऐकत राहतात. ज्यांनी ते ऐकायला पाहिजे ते विद्यार्थी वर्गाबाहेर मजा करीत बसलेले असतात, तसाच हा प्रकार आहे. वरील तक्रारी मराठीबद्दल आस्था बाळगणारे लोकच बहुतेक वाचतात आणि मराठीवर अन्याय करणाऱ्या लोकांपर्यंत त्या पोहोचतही नाहीत. ज्याला इंग्रजीत converting the converted असे म्हणतात. (मतपरिवर्तन झालेल्यांचे मतपरिवर्तन करत बसणे) असा हा प्रकार आहे.

असेही असण्याची शक्यता आहे की ते लोक या तक्रारी वाचतही असतील. पण त्यांवर विचार करून आपल्या वर्तनात बदल करण्याची क्षमता त्या लोकांमध्ये नसते. त्यामुळे तक्रार करणाऱ्यांनी तक्रारी करत राहायचे आणि या लोकांनी त्या नुसत्या ऐकून घ्यायच्या किंवा वाचून स्वस्थ बसायचे. असा प्रकार अव्याहतपणे चाललेला आहे. जुन्या काळातले कठोर पालक मुलाला नुसते, 'तू गाढव आहेस, तू बेअक्कल आहेस, तुला काही कळत नाही' अशा शिव्या देत राहायचे. पण तो नेमका चुकतो कुठे हे त्याला समजावून द्यायला विसरायचे अथवा टाळायचे. त्यामुळे तो बिचारा हताशपणे त्या शिव्या ऐकून घ्यायचा आणि पुन्हा त्याच चुका करत राहायचा. तेव्हा नुसते 'पाट्या अशुद्ध आहेत, उच्चार अशुद्ध आहेत' अशा तक्रारी करण्याने त्या चुका करणाऱ्यांना त्या कळत नाहीत आणि आपलं काही चुकते आहे, याचे भानच नसल्यामुळे त्याच त्याच चुका ही मंडळी करत राहतात त्यांच्या पूर्वीच्या पिढ्याही त्याच चुका करत राहणार आणि नंतरच्या पिढ्याही त्याच चुका करत राहणार.

हे दुष्टचक्र कुठेतरी थांबायला हवे असेल तर आता टीकाकारांनी केवळ टीका करण्यावर भर न देता त्या दोषांविरुद्ध उपाययोजनाही करायला पाहिजे. सुदैवाने या त्रुटीची जाणीव असलेले काही उत्साही लोक पुढे येत आहेत ही समाधानाची गोष्ट आहे. पुण्यामध्ये प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर, प्रा. किरण ठाकूर, वरुणराज भिडे आदी मंडळींनी पुढाकार घेऊन एक उपक्रम हाती घेतला आहे. पाट्या रंगवणारे जे सुलेखन-निष्णात रंगारी असतात, या लोकांना एकत्र जमवून त्यांना ते मराठीच्या लेखन पद्धती, लेखनसंकेत इ. चे प्रशिक्षण देणार आहेत. ते चालू असतानाच आधुनिक डी.टी.पी. तंत्राने मुद्रण कार्यात गुंतलेल्या लोकांनाही त्याच धर्तीवर त्यांच्या गरजांनुसार त्याच तऱ्हेचे प्रशिक्षण देणार आहेत. त्यांच्या समोर तज्ज्ञांची व्याख्याने आयोजित करून त्यांना आपल्या लेखन व्यवहारातील सैद्धान्तिक आणि उपयोजित दोन्ही बाजूंची माहिती देणार आहेत. त्यांच्या हाताशी सहज उपलब्ध होईल असे संदर्भ साहित्य देणार आहेत. हे तिघेही जण वृत्तपत्र व्यवसायातील अनुभवी तज्ज्ञ असल्यामुळे आपल्या लेखन व्यवहारातील अडचणी त्यांना चांगल्या माहीत आहेत. तेव्हा सुरुवात रंगकारांपासून करून या उपक्रमाची व्याप्ती ते हळूहळू वाढवणार आहेत. हा त्यांचा उपक्रम अतिशय स्तुत्य आणि यथोचित असाच आहे. राज्य मराठी विकास संस्थाही उच्चारण सुधारणेचे काही उपक्रम घेत आहे, असे कानी आहे.

आवाहने अथवा दोषदिग्दर्शन करण्याचा काहीच उपयोग नाही, असे येथे म्हणायचे नाही. लोकांच्यामध्ये विशिष्ट प्रश्न जाणवणे हेही जागृतीचे पहिले चिन्ह आहे. त्यांच्या जागृतीचे प्रमाण याप्रकारच्या लेखनावरून कळते. ही जाणीव निर्माण झाल्यानंतर तिच्या निरसनाची गरज निर्माण होते आणि या गरजेतूनच उपाय सुचवून प्रत्यक्ष कृती अंमलात येते. जाणीवजागृती, गरज आणि प्रत्यक्ष कृती अशाच मार्गाने कोणतीही सुधारणा अस्तित्वात येत असते.

हा प्रयत्न एकमेव प्रयत्न नाही. शाळाखात्याने याप्रकारचे प्रकल्प शिक्षकांसाठी यापूर्वीही राबवले आहेत. पण बाह्य क्षेत्रातील व्यक्तींसाठी हा पहिलाच उपक्रम असावा. सर्व भाषाप्रेमींनी अशा उपक्रमांचे स्वागत केले पाहिजे. तसेच या प्रकारचे उपक्रम इतर गावांनीही राबवायला हरकत नाही. एका प्रशिक्षणवर्गाने काम होणार नाही. त्यांची पुन:पुन्हा आवर्तने झाली पाहिजेत. एकाच तुकडीचे कालांतराने उजळणी वर्गही झाले पाहिजेत. सगळ्या गोष्टी शिक्षणखात्यावरच सोपवून आपण नामानिराळे राहण्याऐवजी खाजगी संस्थांनीच असले उपक्रम राबविणे इष्ट आहे. त्यातून भाषाशुद्धीची समाजाची गरज प्रतिबिंबित होत राहील. मुख्य मुद्दा हा आहे की, आता आवाहनांपेक्षा कृती करण्याची वेळ आलेली आहे.

**— कल्याण काळे**



**बातमी लिहिताना — आणि वाचताना**

नागपुरला १०-१२-१९९१ रोजी घडलेल्या घटनेची दुसऱ्या दिवशीच्या वृत्तपत्रात बातमी आली ती अशी —

सकाळ (पुणे) शिवसेना सदस्यांचा सभागृहात गोंधळ

लोकसत्ता (मुंबई) : शिवसेना सदस्यांचा सभागृहात हैदोस

सामना (मुंबई) शिवसेना सदस्यांचा सभागृहात रुद्रावतार

आता पक्षापाती / प्रतिपक्षी / तटस्थ वाचक 'एकाच' बातमीच्या या 'तीन' रुपांना पाहिल्यावर काय म्हणेल याचे गणित सोडवणे अवघड नाही.

किंवा आपण असे म्हणू की वाचक यांना काय म्हणेल यावरून तो पक्षपाती / प्रतिपक्षी / तटस्थ आहे का याचे गणित सहज सोडवता येईल !

पुनर्भेट

# देवनागरी मुद्राक्षरकला - २

दीपक घारे

देवनागरी मुद्राक्षरांचा विकास आणि त्यांचे वर्गीकरण आपण पाहिले. अक्षरमांडणी आणि त्याची मूलतत्त्वे ही इंग्रजी रोमन लिपीप्रमाणे मराठी देवनागरीलाही सारखीच लागू पडतात. मुद्राक्षरकलेच्या संदर्भात देवनागरीसाठी काही बाबतीत कसा वेगळा विचार करावा लागतो हे पाहायचे तर प्रथम दोन्ही लिपींमधील साम्यविरोध लक्षात घ्यायला हवेत. आजच्या रोमन लिपीतील २६ अक्षरे ही प्रतीकात्मक चिन्हांमधून (Pictographs आणि ideographs) मधून विकसित झालेली आहेत. या चिन्हांना मूळ अर्थ काय होता याची आज काहीच माहिती नाही. याउलट देवनागरी लिपीचे उगमस्थान जी ब्राह्मी ती अशा पिक्टोग्रॅफ्सवर आधारित नाही, तर उच्चारांवर आधारित अशा वर्गीकरणानुसार अक्षरांचे अथवा वर्णांचे आकार तिच्यात निश्चित झालेले आहेत. वर्णांचे उच्चारस्थानाप्रमाणे जे प्रकार आहेत. उदा. कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, दंत्य, ओष्ठय - त्यानुसार अक्षरांचे अर्धचंद्राकृती वक्राकार निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यामुळे देवनागरीची अक्षरवळणे ही तुलनेने अधिक तर्कसंगत आहेत. प्रत्येक ध्वनीला स्वतंत्र चिन्ह अथवा वर्ण हा आदर्श लिपीचा निकष मानला तर देवनागरी लिपी तुलनेने अधिक शास्त्रशुद्ध आहे. (जिज्ञासूंनी अधिक माहितीसाठी एल.एस. वाकणकरांचे 'गणेशविद्या - द ट्रॅडिशनल ॲप्रोच टु फोनेटिक राईटिंग' हे पुस्तक पहावे.) रोमन लिपीत व्यंजनांपाठोपाठ स्वरचिन्हे लिहिली जातात. पण स्वरांसाठी मात्रांचा उपयोग हे देवनागरीचे वैशिष्ट्य आहे. मुद्राक्षरकलेच्या दृष्टिकोनातून रोमन व देवनागरी यांच्यातील फरक पुढीलप्रमाणे दाखवता येतील.

| | रोमन | देवनागरी |
|---|---|---|
| १) | कॅपिटल अक्षरे कॅपलाईनपासून बेस लाईनपर्यंत व लोअर केस अक्षरे X हाईट एवढ्या उंचीची असतात.<br>कॅपिटल Q हे अक्षर बेस लाईनच्या खाली येते. | X हाईट ही अक्षराच्या कान्याच्या उंचीएवढी असते. इ, झ, ह इत्यादी अक्षरे तळरेषेच्या खाली येतात. |

| | | |
|---|---|---|
| २) | ॲसेंडर लाईनपर्यंत b,d इत्यादी अक्षरांचे ॲसेंडर्स येतात. | ॲसेंडर लाईनपर्यंत मात्रा, रफार व वेलांटी तसेच अनुस्वार येतात. |
| ३) | डिसेंडर लाईनपर्यंत p,q इत्यादी डिसेंडर्स येतात. | डिसेंडर लाईनपर्यंत उकार, ऋकार येतात. |
| ४) | अलाईनमेंट बेस लाईनला असते. | अक्षरांची जुळणी (अलाईनमेंट) शिरोरेखेशी असते. |
| ५) | सेरिफ असतात. | वाचनसुलभता हे सेरिफचे कार्य शिरोरेखा करते. |
| ६) | व्हर्टिकल स्ट्रोक वर व खाली बेस लाईनला समांतर व सेरिफसह असतो. | अक्षराचा उभा टाक, काना खालच्या टोकाला तिरपा असतो. |
| ७) | चौरस, आयत, त्रिकोण, वर्तुळ अशा भौमितिक आकारांवर आधारित अक्षरांची रुंदी विषम प्रमाणात असते. | अक्षरांची रुंदी साधारणपणे सारखी असते. काना, जोडाक्षरे यामुळे रुंदी कमीजास्त होते. |
| ८) | मध्यरेषा (वेस्ट लाईन) मुळे X हाईटचे दोन भाग होतात. | वरची आणि खालची मध्यरेषा असल्यामुळे X हाईटचे चार भाग होतात. |
| ९) | अक्षरांतर्गत आकार आणि मोकळी जागा यांचे काळ्या अक्षराशी संतुलन साधणे तुलनेने सोपे असते. | ह, ई अशा अक्षरांमुळे आणि काना, जोडाक्षरे यांमुळे डोळ्यांना सारखी वाटेल अशी मोकळी जागा सोडणे अधिक अवघड जाते. |
| १०) | मजकुरासाठी १०/१२ पॉईंट किंवा १२/१४ पॉईंट मुद्राक्षरे वापरतात. | मजकुरासाठी १२/१४ पॉईंट किंवा १३/१५ पॉईंटची मुद्राक्षरे वापरतात. |
| ११) | जुळणीस वेळ कमी लागतो. | जुळणीस वेळ जास्त लागतो. |

| | रोमन | | देवनागरी | |
|---|---|---|---|---|
| I | स्ट्रोक | सरळ अथवा वक्र रेषा | ग्रिपरेषा (दंड) | |
| b | ॲसेंडर | X हाईटच्या वर जाणारा अक्षरांचा भाग | मात्रा रफार<br>अनुस्वार<br>चंद्र | |
| p | डिसेंडर | X हाइटच्या खाली येणारा अक्षरांचा भाग | उ कार<br>ऋ कार | |
| x | X हाईट | ॲसेंडर व डिसेंडर मात्रा व उ कार वगळून येणारी अक्षरांची उंची | X उंची<br>'क' उंची | |
| P | बाऊल (Bowl) | अक्षरांतर्गत पोकळी तयार करणारी वक्ररेषा | वक्राकार (crescent) | |
| e | काऊंटर | वक्ररेषांमुळे व रेषांमुळे पूर्ण अथवा अंशतः बंदिस्त झालेली मोकळी जागा | पोकळी | |
| L | स्टेम | काटकोनातला उभा अथवा उभा स्ट्रोक नसलेल्या अक्षरातील तिरपा स्ट्रोक — अ कारासाठी येणारा ग्रीप काटकोनातली उभी रेखा | मध्य दंड<br>शीर्ष दंड<br>अंत्य दंड | |
| I | सेरिफ | मुख्य स्ट्रोकच्या शेवटी येणारी छोटी आडवी रेषा — अक्षरांना एकत्र जोडणारी वरच्या बाजूची आडवी रेषा | शिरोरेखा | |

**अक्षरांचे अवयव**

अक्षरवळणे तयार करतांना सुलेखनशैली अथवा मुद्राक्षरांची वैशिष्ट्ये सांगण्यासाठी परिभाषेची आवश्यकता असते. देवनागरी लिपीतील अक्षरांसाठी अशी परिभाषा रूढ झालेली नाही. डीटीपी अथवा फोटोटाईपसेटिंगसारख्या मुद्राक्षरजुळणीच्या पद्धती रोमन लिपीच्या अनुषंगाने विकसित झाल्या असल्याने व बऱ्याच वेळा इंग्रजी-मराठी, इंग्रजी-हिंदी अशा द्वैभाषिक स्वरूपात मजकुराची जुळणी होत असल्यामुळे ही परिभाषा रोमन लिपीच्या परिभाषेशी संवादी असेल तर अधिक चांगले.

या दृष्टिकोनातून मागे तौलनिक तक्ता दिला आहे. देवनागरी अक्षरांच्या अवयवांची नावे निवडतांना बापूराव नाईक ('Typography of Devanagari') व मुकुंद गोखले ('Caltis' 85) यांनी वापरलेल्या परिभाषेचा आधार घेतला आहे. जे पारिभाषिक शब्द उपलब्ध नाहीत तिथे स्वतःचे शब्द योजले आहेत.

**संच आणि एकाच अक्षरवळणाचे विविध प्रकार :-**

देवनागरी मुद्राक्षरांचे संच जुळणीच्या पद्धतीप्रमाणे कमी अधिक अक्षरांचे/चिन्हांचे असतात. स्वरचिन्हे, व्यंजने, अर्धी अक्षरे, जोडाक्षरे, उकारी व ऋकारी अक्षरे, आकडे व विरामचिन्हे यांचा मिळून एक संच (फाऊंट) बनतो. डिग्री टाईपमध्ये सुमारे ३७५, मोनो मध्ये २७० तर फोटो टाईपसेटिंग, डी.टी.पी. मध्ये अक्षरे असतात.

फोटो टाईपसेटिंग, डी.टी.पी. वर देवनागरी अक्षरवळणांचे लाईट, बोल्ड तसेच आवळ, रुंदट, तिरपी असे विविध प्रकार उपलब्ध आहेत. एकच अक्षरवळण विविध प्रकारांमध्ये रूपांतरित करताना काही अक्षरांची वळणे तितकी सुडौल रहात नाहीत, किंवा त्याची सुवाच्यता कमी होते. शेजारच्या चित्रातील देवनागरी हा शब्द आणि त्याची वळणे पाहिली की हे लक्षात येईल. विशेषतः त्यातील ना हे अक्षर पहावे. आवळ (कंडेन्स्ड) आणि जाड (बोल्ड) प्रकारामध्ये 'ना' ऐवजी 'ता' असे वाटते. त्यामुळे अक्षरवळण रूपांतरित करताना वाचनसुलभता, सुवाच्यता आणि सुडौलपणा लक्षात घ्यावा लागतो.

**मोकळी जागा (स्पेसिंग)**

देवनागरीमध्ये जोडाक्षरे, काना, वेलांट्या, इत्यादी येत असल्यामुळे मोकळ्या जागेमध्ये सारखेपणा आणणे कठीण जाते. सर्व अक्षरांची रुंदी साधारणपणे सारखी असली, तरी त्याला दुसरे अक्षर जोडले, काना जोडला, की त्याची रुंदी वाढते आणि अक्षरे लहानमोठी दिसतात. त्यामुळे अक्षरांच्या पोकळीमधील जागा आणि दोन अक्षरांमधील मोकळी जागा यांचे संतुलन बिघडते ते दुरुस्त करण्याची सोय सध्या तरी संगणकीय जुळणीतंत्रात नाही. यांत्रिक जुळणीची ही मर्यादा मानली पाहिजे. देवनागरी लिपीचा विकास, जुळणीतंत्राच्या बदलत्या पद्धती आणि देवनागरी मुद्राक्षरकलेविषयीचा थोडक्यात परामर्श आपण घेतला. देवनागरी मुद्राक्षरकलेची अगदी बाल्यावस्था आता राहिली नसली, तरी सुधारणेला आणि निर्दोष, सौंदर्यपूर्ण रचनेला त्यात अजूनही बराच वाव आहे, हे त्यावरून लक्षात येईल. देवनागरीला प्राचीन परंपरा आहे. जिचा उगम शंकराच्या डमरूतून झाला, जी शंकराच्या आणि वागीश्वरी सरस्वतीच्या माथ्यावर चंद्रकोरीच्या प्रतीकाने विराजमान झालेली आहे, (आद्यां यौवनगर्वितां लिपितनूम् वागीश्वरीमाश्रये) ती ही ब्राह्मी लिपीतून विकसित झालेली देवनागरी. 'अक्षराणाम् अ-कारोऽस्मि' असे गीतेत श्रीकृष्णाने सांगितले आहे. लिप्यांमध्ये देवनागरीला असे अ-काराचे मध्यवर्ती स्थान मिळवायचे असेल, तर तिला नव्या तंत्रज्ञानाच्या व्यावसायिक कसोट्या आणि आव्हाने स्वीकारावी लागतील. देवनागरी मुद्राक्षरकलेची आजची स्थिती पाहता स्वतःच्या गुणवैशिष्ट्यांशी तडजोड न करता नित्यनूतनता टिकवण्याची क्षमता तिच्यात आहे एवढेच म्हणता येईल.

**मांडणी : लेटरहेड आणि व्हिजिटिंग कार्डची**

संकल्पचित्राची मूलतत्त्वे आणि मुद्राक्षरकला यांची ओळख आपण करून घेतली.

त्यानंतर साहजिकच प्रश्न येतो तो मांडणीचा. चित्रे आणि मजकूर या बरोबरच मांडणीमध्ये तिसरा घटक येतो, तो मोकळ्या जागेचा. मांडणी म्हणजे या तीनही घटकांची संतुलित, आकलनसुलभ आणि आकर्षक अशी रचना होय. लेटरहेड, व्हिजिटिंग कार्डपासून ते पुस्तके, मासिके, इत्यादींपर्यंत प्रत्येक मुद्रित उत्पादनाच्या निर्मितीच्या प्रत्येक टप्प्यावर मांडणीचा विचार करावाच लागतो.

अगदी साध्या शब्दात सांगायचे, तर मांडणी (Layout) म्हणजे शिस्त, सुसूत्रता, चित्र, भाषा, संगीत-माध्यम कोणतेही असो-या माध्यमातून संवाद साधायचा असेल तर यातील घटकांची तर्कशुद्ध संगतवार मांडणी हवी. अन्यथा ती आकृतींची, चिन्हांची, सुरांची खिचडी होईल! म्हणजेच प्रत्येक माध्यमाला स्वतःचे असे एक व्याकरण असते. कर्ता, कर्म, क्रियापद अशा क्रमाने शब्दांची रचना असली, म्हणजेच आपल्याला अर्थबोध होतो. हे व्याकरण म्हणजेच मांडणी. मुद्रणासारख्या दृश्यकलेच्या अंगाने व्यक्त होणाऱ्या माध्यमाला आशयानुरूप घटकांची मांडणी आणि मुद्राक्षरांचा योग्य तो वापर करून सुसूत्रता आणावी लागते. उदा., लेटरहेडची मांडणी करताना दूरध्वनी क्र. चटकन दिसेल असा वरच्या कोपऱ्यात, उद्योगसमूहाचे नाव मोठ्या पॉईंटसाईझमध्ये, त्याखाली लगेच पत्ता, अशी सुसूत्र मांडणी करावी लागते. त्यामुळे पत्र वाचणाऱ्यास पत्रलेखकाचा चटकन बोध होणे, हवी ती माहिती चटकन मिळणे सुलभ होते आणि या सुसंवादी घटकांचा एकात्म परिणाम होऊन पत्रलेखकाबद्दलची एक आदर्श प्रतिमा वाचकासमोर तयार होते.

**मांडणीचे फायदे :** मुद्रकाच्या दृष्टीने मांडणीचे अनेक फायदे आहेत. कलात्मक दृष्टीने घटकांची रचना केल्याने कोणतेही मुद्रणाचे काम सुबक आणि चांगले तर दिसतेच, पण त्यामुळे वेळ वाचतो. मांडणीचे कच्चे आराखडे करून बघितले, तर सुधारणेला वाव राहतो. आणि वेळेची, श्रमांची बचत झाल्यामुळे अनावश्यक खर्चही कमी होतो. मांडणींच्या पद्धतीमध्ये प्रत्येक मुद्रणालयाची ठरलेली कार्यपद्धती असते. अशा कार्यपद्धतीमुळे संकल्पचित्रकारापासून, जुळारी, छपाईकामगार, बांधणीविभाग यांना दिलेल्या सूचनांमध्ये संदिग्धता राहत नाही, संवाद चांगला साधला जातो आणि कार्यक्षमताही वाढते. जुळणीच्या मजकुरासाठी कोणता टाईप वापरायचा, दोन ओळींमधील अंतर किती ठेवायचे, शब्द कुठे तोडायचा, हेडिंग, सब-हेडिंग कसे घ्यायचे इत्यादींच्या स्पष्ट सूचना असलेली पुस्तिका मोठ्या मुद्रणालयांमध्ये असते. त्याला 'हाऊस स्टाईल' असे म्हणतात. मांडणीमध्ये सुसूत्रता आणण्याचे हाऊस स्टाईल हे महत्त्वाचे साधन आहे. दुसरे साधन म्हणजे, मांडणी आराखडा (Layout Grid). मुद्रणप्रकारानुसार अशी अनेक साधने आणि युक्त्या मांडणी करताना वापरल्या जातात. त्यांची ओळख त्या त्या वेळेस सविस्तरपणे करून दिली जाईलच.

मांडणी करताना पुढील प्राथमिक मुद्दे लक्षात घ्यावे लागतात. या गोष्टी अगदी साध्या असल्या, तरी त्या लक्षात न घेतल्यामुळे कौशल्यपूर्ण मांडणीचा प्रत्यक्ष

मुद्रणामध्ये विचका होऊ शकतो.

- मांडणीचा आकार काटेकोरपणे पाळायला हवा. लेटरहेड, व्हिजिटिंग कार्ड, वृत्तपत्रांचे कॉलम्स, मासिकाच्या पानाचे आकार हे ठरलेले असतात. त्यानुसारच ते घ्यायला हवेत.
- मांडणी करताना चारही बाजूंनी मोकळी जागा सोडणे आवश्यक असते. अन्यथा मुद्रण झाल्यावर कागद कापताना थोडे जरी कमी- जास्त कापले गेले, तरी एखादे अक्षर किंवा ओळ कापली जाण्याची शक्यता असते.
- सलग मजकुराचे परिच्छेद पाडले, की जसे आकलन सुलभ होते, त्याप्रमाणेच मांडणीमध्येही माहिती/मजकुराचे छोटे छोटे गट पाडले, की संवाद अधिक सोपा होतो. मांडणी आकर्षक करण्यासाठी रुळा, शीर्षके, उपशीर्षके, बाण, टिंब, चांदणी अशा चिन्हांचा वापर करावा.
- संकल्पचित्राची मूलतत्त्वे (यशोमुद्रा-नोव्हे. डिसें., ९१) आणि मुद्राक्षरकला यांचा उपयोग मांडणी करताना करावा.
- मुद्रणालयाच्या आणि उपलब्ध यंत्रसामग्रीच्या मर्यादा लक्षात घेऊन मांडणी करावी. मांडणी कितीही चांगली असो, ती प्रत्यक्षात मुद्रणाद्वारे आणता येत नसेल, तर त्याचा काहीही उपयोग नाही. मुद्रणामध्ये ज्याचे बारकावे नष्ट होतील, ज्या रंगच्छटा बदलतील त्या न वापरणेच चांगले. रुळांनी बनवलेल्या चौकटी या मांडणीची आकर्षकता वाढवतात, हे खरे. पण बांधणी करताना जर पुस्तक अथवा मासिक काटकोनात कापले गेले नाही, तर तिरप्या मार्जिन्स एरवी लक्षात आल्या नसत्या, त्या चौकटीमुळे चटकन लक्षात येतात! ज्याप्रमाणे आपल्याला काय येते, यापेक्षा काय येत नाही, ही ज्ञानाची पहिली पायरी मानली जाते, त्याप्रमाणेच मांडणी करताना आपल्या मुद्रणालयाच्या मर्यादा काय आहेत, याचे भान ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे ग्राहकाच्या अपेक्षा अवास्तव उंचावणार नाहीत आणि नंतर मनस्तापाची पाळीही येणार नाही.

**लेटरहेड आणि व्हिजिटिंग कार्ड :**

हाऊस स्टाईल डिझाईन आणि कॉर्पोरेट आयडेंटिटी

लेटरहेडचा स्वतंत्रपणे विचार न करता पत्रलेखनसामग्री (स्टेशनरी आयटेम्स) चा एकत्रित विचार करणे फायद्याचे असते. मांडणीचे मुख्य सूत्र जी सुसूत्रता, ती यामुळे साधली जाते. आणि पत्रलेखकाची अथवा उद्योगाची एक आश्वासक प्रतिमा त्यामुळे तयार होते. यालाच हाऊस स्टाईल डिझाईन असे म्हणतात. वर मांडणीच्या विवेचनामध्ये हाऊस स्टाईल ही संज्ञा आली आहे, त्याचा या हाऊस स्टाईल डिझाईनशी संबंध नाही. हाऊस स्टाईलचा विचार बोधचिन्हाच्या निवडीपासून सुरू होतो. व्यक्तीचे/उद्योगसमूहाचे नाव, पत्ता, इत्यादींसाठी टाईपाची निवड, मांडणी आणि रंगसंगती

निश्चित करणे आणि लेटरहेडसाठी निश्चित केलेली विशिष्ट रचना व्हिजिटिंग कार्ड, लिफाफा, बिल फॉर्म, चलन, इत्यादींसाठी शक्यतो जशीच्या तशी वापरणे याला हाऊस स्टाईल असे म्हणतात.

कॉर्पोरेट आयडेंटिटी हे हाऊस स्टाईलचेच अधिक प्रगत आणि विस्तारित असे रूप आहे. नुसती पत्रलेखनसामग्रीच नव्हे, तर एखाद्या उद्योगाच्या मालकीच्या इमारती, त्यांची सजावट, वाहने अशा उद्योगाशी संबंधित प्रत्येक गोष्टीवर एक परिचित मुद्रा उमटवणे म्हणजे कॉर्पोरेट आयडेंटिटी. उद्योगाच्या ध्येयधोरणांचा, तत्त्वज्ञानाचा, कॉर्पोरेट फिलॉसॉफीचा सम्यक् विचार इथे अपेक्षित असतो. आजच्या इलेक्ट्रॉनिक युगात वास्तवापेक्षा प्रतिमेलाच अवास्तव महत्त्व आलेले आहे, त्यामुळे कॉर्पोरेट आयडेंटिटीवर, उद्योगाच्या या मानबिंदूवर सर्वाधिक खर्च केला जातो.

**बोधचिन्ह (ट्रेड मार्क)**

बोधचिन्ह हा लेटरहेडचा महत्त्वाचा घटक आहे. वर सांगितल्याप्रमाणे ते बरेच परिश्रम आणि पैसा खर्च करून बनविले जाते. किंवा बऱ्याच वेळा मुद्रकाकडे एखादे लेटरहेडचे काम आले, तर एखादा संकल्पचित्रकार किंवा स्वतः मुद्रकच थोडी हुशारी आणि कौशल्य वापरून एक बोधचिन्ह तयार करतो. बोधचिन्ह कोणत्याही पद्धतीने बनवलेले असो, त्याचा उद्देश, प्रकार, कायदेशीर वापर या गोष्टी प्रत्येक मुद्रकाला माहीत असणे आवश्यक आहे. बोधचिन्ह हा एक प्रकारे एखाद्या उद्योगसमूहाच्या उत्पादनाच्या स्वरूपाचा, ध्येयधोरणांचा सोप्या, अर्थवाही भाषिक चिन्हांच्या अथवा चित्राच्या आधारे सांगितलेला सारांश असतो. ट्रेडमार्क ही बोधचिन्हाला सर्वसाधारपणे वापरली जाणारी संज्ञा आहे. एखादे बोधचिन्ह एकदा रजिस्टर केले, की त्याचा उपयोग अन्य कुणालाही परवानगीशिवाय करता येत नाही.

- ❑ हे बोधचिन्ह चित्रमय प्रतीक असेल, तर त्याला सिम्बॉल असे म्हणतात.
- ❑ कंपनीच्या नावाची आद्याक्षरे असतील, तर त्याला मोनोग्रॅम म्हणतात.
- ❑ कधी कधी दोन्हींचा वापरही बोधचिन्हामध्ये आढळतो. उदा., एल्. आय्. सी. च्या बोधचिन्हामध्ये आद्याक्षरे आहेत आणि ज्योत आणि संरक्षक हात असे प्रतीकही आहे. एच्. एम्. टी. हा मोनोग्रॅम आहे.
- ❑ बोधचिन्ह हे एखाद्या कंपनीचे नाव असेल आणि ते विशिष्ट वळणात असेल तर त्याला लोगो असे म्हणतात. उदा., गोदरेज, टाटा, कॅडबरीज्, इत्यादी.
- ❑ ॲडव्हर्टायझिंग कॅरॅक्टर्स हा देखील बोधचिन्हांचाच एक प्रकार आहे. एअर इंडियाचा महाराजा, एशियन पेन्टसूचा गट्टू, गोदरेज फ्रीजचा पफ अशा व्यक्तिरेखांमुळे ग्राहकांशी अधिक जवळीक साधता येते.
- ❑ बोधचिन्हांची मांडणी करताना पुढील गोष्टी लक्षात घ्याव्यात.
- ❑ बोधचिन्ह अतिशय साधे पण अर्थवाही असावे.

- इतर चिन्हांपेक्षा त्यात वेगळेपणा असावा.
- व्हिजिटिंग कार्डपासून ते होर्डिंगपर्यंत बोधचिन्ह वापरायचे असल्याने ते अगदी लहान अथवा मोठ्या आकारात छापता येईल असे असावे.
- बोधचिन्ह अनेक वर्षे तेच राहणार असल्याने लगेच कालबाह्य होईल अशी मांडणी असू नये.
- चौकोन, वर्तुळ, आयत असा निश्चित आकार असलेली बोधचिन्हे अधिक प्रभावी ठरतात.
- एक किंवा दोन रंगांमध्ये बोधचिन्ह सारखेच प्रभावी वाटले पाहिजे.

**लेटरहेड :**

पत्रलेखनाइतकी लेटरहेडची पद्धत जुनी नाही. पण सोळाव्या आणि सतराव्या शतकांत युरोपमध्ये स्वतःचे बोधचिन्ह असलेली पत्रे वापरण्याची प्रथा रूढ होती. पत्रलेखकाचे व्यक्तिमत्त्व त्यात प्रतिबिंबित व्हावे, अशी अपेक्षा असे. आज व्यक्तिगत पत्रलेखनासाठी वापरली जाणारी पर्सनल लेटरहेडस् ही त्याचाच प्रगत आविष्कार आहेत. यंत्रयुग सुरू झाल्यावर कारखाने आणि उत्पादकांची वाढ झाली. त्यांची स्पर्धा वाढली. आणि स्वतःचे वेगळे अस्तित्व प्रस्थापित करण्यासाठी कल्पक अशा बिझिनेस लेटरहेडसची निर्मिती करणे उद्योजकांना अपरिहार्य होऊन बसले.

**उद्देश :** पत्रलेखकाचा संदर्भ चटकन लक्षात यावा आणि त्याचे नाव, पत्ता, दूरध्वनी क्र., इत्यादी माहिती सहज उपलब्ध असावी, म्हणून ती पत्राच्या माथ्यावर छापणे.

पत्रलेखकाची अथवा उद्योगाची आश्वासक प्रतिमा तयार करणे.

**लेटरहेडचे घटक :** पर्सनल लेटरहेड असेल, तर नाव, पत्ता, दूरध्वनी क्रमांक.

बिझिनेस लेटरहेडसाठी बोधचिन्ह, उद्योगाचे नाव, व्यवसायाचे स्वरूप समजावे, म्हणून तपशील पुरवणारी एखादी ओळ, पत्ता, दूरध्वनी क्र., टेलेक्स, फॅक्स, इत्यादी.

**आकार :** पर्सनल लेटरहेड ७'' × ९'' किंवा ५ $\frac{१}{२}$'' × ९''

बिझिनेस लेटरहेड ८ $\frac{१}{२}$ × ११'' A-4 Size

**कागद :** लेटरहेडसाठी साधारणपणे बॉन्ड पेपर वापरतात. सनलिट बॉन्ड, जे.के.बॉन्ड, एक्झिक्यूटिव्ह बॉन्ड. आकार साधारणपणे १८'' × २३'' मध्ये उपलब्ध. ओनियन स्किन पेपर, रंगच्छटा असलेले किंवा हँडमेड पेपरसुद्धा वापरले जातात.

**मांडणी :** मांडणी करताना आणि मुद्राक्षरांची निवड करताना ती परिणामकारक होईल, पण भडक होणार नाही, याची काळजी घेतली पाहिजे. लेटरहेड म्हणजे जाहिरात नव्हे.

लेटरहेडवर डाव्या बाजूस समासासाठी किमान १'' मोकळी जागा सोडणे आवश्यक असते. फाईलिंग केल्यावर लेटरहेडवरची महत्त्वाची माहिती त्यात जाऊ नये.





अनुक्रमणिका

म्हणून या जागेत काहीही न छापणे चांगले. पाठीवर मजकूर लिहिला जाणार असेल, तर पहिल्या बाजूच्या समासाचे जागीच पाठीवरचा समास असावा. म्हणजे मजकुरास फाइलिंगचे वेळी भोके पडणार नाहीत.

पत्र लिहिणे हा लेटरहेडचा प्रमुख उद्देश. त्यामुळे पत्रलेखनासाठीच्या जागेवर लेडरहेडच्या मांडणीचे अतिक्रमण होत नाही ना, याकडे लक्ष पुरवणे आवश्यक.

माथ्यावरची, मध्यावरची किंवा उजव्या कोपऱ्यातली साधारणपणे दोन-अडीच इंचापर्यंतची जागा लेटरहेडसाठी योग्य जागा आहे. खालच्या बाजूस एका ओळीत पत्ता अथवा अन्य माहिती येऊ शकते.

सर्व मजकूर केंद्रानुवर्ती समतोल साधून मांडता येतो. किंवा चैतन्यपूर्ण समतोल साधून, रूल्स, चिन्हे यांचा वापर करून लेटरहेडची मांडणी अधिक आकर्षक होते.

**मुद्राक्षरकला** : व्यवसायाच्या स्वरूपानुसार मुद्राक्षरवळणे निवडावीत - सौंदर्यप्रसाधने, किमती उत्पादने यांसाठी सेरिफ व नाजूक मुद्राक्षरवळणे वापरावीत, तर पोलाद, यंत्रसामग्रीसाठी सेरिफविरहित मुद्राक्षरे वापरावीत.

पत्ता, दूरध्वनी क्र., इत्यादींसाठी ८ ते १० पॉईंटचा लोअर केस टाईप वापरावा.

पर्सनल लेटरहेडमधील नावासाठी १४ पॉईंटपर्यंत, तर बिझनेस लेटरहेडमध्ये कंपनीचे नाव बोल्ड टाईपमध्ये आणि १८ ते २४ पॉईंटपर्यंत असावे.

बोधचिन्हाचा आकार अर्धा ते पाऊण इंच असावा.

**रंग :** लेटरहेड सर्वसाधारणपणे दोन अथवा तीन रंगांत छापले जाते. अलीकडे अधिक रंगांमध्ये, हाफटोन वापरून लेटरहेड्स अधिक प्रमाणात छापली जाऊ लागली आहेत. पत्ता - दूरध्वनी क्र., इत्यादींसाठी काळा रंगच साधारणपणे वापरावा. बोधचिन्ह किंवा कंपनीचे नाव दुसऱ्या रंगात अधिक उठावदार दिसते. लाल-काळा, नारिंगी-काळा, नारिंगी-करडा, स्कारलेट रेड-नेव्ही ब्ल्यू, गडद तपकिरी किंवा यलो ऑकर-ब्लॅक या काही नेहमी वापरल्या जाणाऱ्या रंगसंगती आहेत.

रंगांमुळे प्रतीकात्मता साधली जाते. तसेच ओळख पटण्यासाठी (आयडेंटिफिकेशनसाठी) त्याचा उपयोग होतो. कॅडबरीज् म्हटले, की चॉकलेटी, एअर-इंडिया म्हटले, की लाल रंगातलीच अक्षरे आपल्या डोळ्यांसमोर येतात.

एम्बॉसिंग, वॉटरमार्क सारख्या युक्त्याही रंगांप्रमाणेच लेटरहेडमध्ये आकर्षकता आणि वेगळेपणा आणण्याचे कार्य करतात.

**व्हिजिटिंग कार्ड :** लेटरहेडसाठी वापरलेली रंगसंगती, मुद्राक्षरे आणि मांडणी अगदी आवश्यक तेवढे फेरबदल करून व्हिजिटिंग कार्डमध्ये वापरली जाते. लेटरहेड हे तुमच्या अनुपस्थितीत तुमच्याबद्दलची चांगली-वाईट प्रतिमा निर्माण करीत असते, तर व्हिजिटिंग कार्ड तुमची ओळख करून देण्याचे काम करीत असते. तुमच्या

व्यक्तिमत्त्वाला पोषक ठरेल, असा व्हिजिटिंग कार्ड हा एक प्रकारचा अग्रदूतच आहे!

**व्हिजिटिंग कार्डचे घटक :**

पर्सनल व्हिजिटिंग कार्डसाठी नाव, पत्ता, दूरध्वनी क्र.

बिझिनेस कार्डसाठी बोधचिन्ह, उद्योगाचे नाव, पत्ता, दूरध्वनी क्र., टेलेक्स, इत्यादी.

प्रतिनिधित्व करणाऱ्याचे नाव, हुद्द्यासह.

आवश्यक असल्यास घराचा पत्ता व दूरध्वनी क्र.

**आकार :** २ $\frac{१}{२}$ '' × ३ $\frac{१}{२}$ '' (५ × ९ सें.मी.)

**कागद :** जाड कार्ड किंवा अलीकडे प्लास्टिकसारखे इतर पृष्ठभागही वापरले जातात. काही वेळा व्हिजिटिंग कार्ड ग्रीटिंगसारखे घडी केलेलेही असते.

**मांडणी :** बरीच माहिती थोड्या जागेत बसवायची असल्याने व्हिजिटिंग कार्डची मांडणी कौशल्याने करावी लागते.

सर्व बाजूंनी १/४'' किंवा ०.५ सें.मी जागा सोडणे आवश्यक.

दूरध्वनी क्र. टेलेक्स वरच्या उजव्या कोपऱ्यात घ्यावा.

कंपनीचे नाव, पत्ता हा गट कार्डच्या ख़ालील बाजूस असावा.

प्रतिनिधींचे नाव इतर माहितीपेक्षा थोडे वेगळे वाटले पाहिजे. म्हणून ते स्वतंत्रपणे, चारी बाजूंना जरा अधिक जागा सोडून घ्यावे.

बोधचिन्ह चटकन लक्ष वेधून घेईल, अशा ठिकाणी असावे. मुद्राक्षरकला-बोधचिन्हाचा आकार ३/४'' अथवा २ सें.मी. पेक्षा अधिक नसावा.

कंपनीचे नाव १४ ते १८ पॉईंट बोल्डमध्ये असावे.

पत्ता, दूरध्वनी क्र., इत्यादींसाठी ८ पॉईंट कॅप्स किंवा अपर लोअर टाईप वापरावा.

प्रतिनिधीचे नाव १० पॉईंटमध्ये असावे.

लिफाफा, बिल फॉर्म, इत्यादींसाठी एकच हाऊसस्टाईल वापरली जात असल्यामुळे त्याबद्दल विस्ताराने लिहिण्याची आवश्यकता नाही.

लेटरहेड, व्हिजिटिंग कार्डस्, लेटरप्रेसने व स्क्रीन प्रिंटिंगने छापली जातात. स्क्रीन प्रिंटिंगची पद्धत अधिक सोयीची आहे. कारण तजेलदार रंगांमुळे , शाईच्या जाड थरामुळे ती आकर्षक दिसतात. अक्षरजुळणी फोटोटाईपसेटिंग किंवा डी.टी.पी. संगणकावर करता येत असल्यामुळे मांडणी करण्यास अधिक वाव मिळतो. तसेच, मुद्राक्षरांची वळणे व दर्जा उत्तम मिळतात. लेटरहेड किंवा व्हिजिटिंग कार्ड यांच्या प्रतींची संख्या फार नसते. कमी संख्येसाठी स्क्रीन प्रिंटिंग किफायतशीर पडते.

हाऊस स्टाईलमध्ये सर्वसाधारणपणे पाळले जाणारे मांडणीचे नियम आणि

त्यामागचा कार्यकारणभाव हा असा आहे. हे नियम पूर्णपणे मोडूनही उत्कृष्ट मांडणी करता येईल. पण त्यासाठी तरी हे नियम आधी जाणून घेणे आवश्यक आहे!

**सोयिस्कर व्यापारी कामांचे आकार**

| प्रकार | आकार | एम्एम् | इंच |
|---|---|---|---|
| वृत्तपत्रे | अ २ | ४२० × ५९४ | १६.५" × २३.५" |
| | अ ३ | २९७ × ४२० | ११.५" × १६.५" |
| नियतकालिके | अ ३ | २९७ × ४२० | ११.५" × १६.५" |
| | अ ४ | २१० × २९७ | ८.५" × ११.५" |
| | अ ५ | १४८ × २१० | ६" × ८.५" |
| पुस्तके | अ ४ | २१० × २९७ | ८.५" × ११.५" |
| | अ ५ | १४८ × २१० | ६" × ८.५" |
| | अ ६ | १०५ × १४८ | ४" × ६" |
| व्यापारी काम | अ ४ | २१० × २९७ | ८.५" × ११.५" |
| नोटपेपर्स | अ ५ | १४८ × २१० | ६" × ८.५" |
| | अ ६ | १०५ × १४८ | ४" × ६" |
| पोस्टकार्ड | अ ६ | १०५ × १४८ | ४" × ६" |
| भेटपत्रे | | ५० × ९० | २.२" × ३.५" |

**पाकिटे**

३५सें.मी. × १५सें.मी
१५सें.मी. × १०सें.मी.
१६सें.मी. × १२सें.मी.
२३सें.मी. × १०सें.मी.
२८सें.मी. × १३सें.मी.
३०सें.मी. × २४सें.मी.
१४सें.मी. × ११सें.मी.
१८सें.मी. × १०सें.मी.
२३सें.मी. × १०सें.मी.
२३सें.मी. × १५सें.मी.
१२सें.मी. × ९सें.मी.

मूर्खास वाटे मी शहाणा। परी तो वेडा दैन्यवाणा।
नाना चातुर्याच्या खुणा। चतुर जाणे।।१३।।
जो जगदांतरे मिळाला। तो जगदांतरचि जाला ।

अरत्री परत्री तयाला। काये उणे ।।१४।।
बुद्धि देणे भगवंताचे। बुद्धिवीण माणूस काचे।
राज्य सांडून फुकाचे। भीक मागे ।।१५।।
जे जे जेथे निर्माण जाले। ते ते तयास मानले ।
अभिमान देऊन गोविले। ठाई ठाई।।१६।।
अवघेच म्हणती आम्ही थोर। अवघेचि म्हणती आम्ही सुंदर।
अवघेची म्हणती आम्ही चतुर। भूमंडळी ।।१७।।
ऐसा विचार आणिता मना। कोणीच लहान म्हणवीना।
जाणते आणिती अनुमाना। सकळ काही।।१८।।
आपुलाल्या साभिमाने। लोक चालिले अनुमाने।
परंतु हे विवेकाने। पाहिले पाहिजे।।१९।।
लटिक्याचा साभिमान घेणे। सत्य अवघेच सोडणे।
मूर्खपणाची लक्षणे। ते हे ऐसी।।२०।।
सत्याचा जो साभिमान। तो जाणावा निरभिमान।
न्याये अन्याये समान। कदापि नव्हे।।२१।।

दासबोध द. १५, स. १

**ई १८, सचदेवनगर, सी ब्लॉक, शहाड (पूर्व) स्कीम नं. २ उल्हासनगर ३.**

**(यशोमुद्रा मे, १९९२ च्या अंकामधून संमतिपूर्वक.)**

❐



अनुक्रमणिका

# ज्ञानप्रक्रिया आणि भाषाव्यवहार

**शैलेश सदाशिव पुंडलिक**

१.१) *वागर्थाविव संपृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।*

*जगतः पितरौ वंदे पार्वतीपरमेश्वरौ ।।* (रघुवंश १.१)

ज्ञानप्रक्रिया आणि ज्ञानोपकरणात्मक ऐंद्रिय अनुभूती या दोन्ही प्रक्रियांत अनुभूती ही पदार्थाच्या गुणधर्माची असून, स्वतः पदार्थ मात्र अनुमानगम्य वस्तू आहे, असे निदर्शनास येते?[१] प्रत्यक्ष ज्ञानोपलब्धी अनुमानपूर्व मानावी, की अनुमानानुसारी मानावी/असते, हा विवादास्पद प्रश्न आहे. त्यातील सर्व तात्त्वज्ञानिक मुद्दे इथे विवेचनात घेता आले नाहीत, तरी ज्ञाननिष्पत्तीसाठी एका विचाराकडून दुसऱ्या विचाराकडे संक्रमण होणे आवश्यक आहे ही गोष्ट स्वयंसिद्ध किंवा axiomatic मानल्यास ज्ञानोपलब्धी अनुमानानुसारी आणि भाषावलंबी होईल.[२] त्यामुळे ज्ञाननिष्पत्ती आणि जड जगताची ऐंद्रिय अनुभूती यांचा कार्यकारणसंबंध प्रस्थापित करणे सकृद्दर्शनी आकर्षक आणि सोपे वाटले, तरी ते वस्तुस्थितीचे अतिसाधारणीकरण आणि अतिसुगमीकरण होईल. व्यक्तिमत्त्वाच्या वैचारिक (cognitive) पैलूप्रमाणे भावनिक (affective) आणि ऐच्छिक (conative) हे पैलू सुद्धा ज्ञानसंचाचे घटक होतात, ही वस्तुस्थिती लक्षात घेतली, की ज्ञानसंधारणाखेरीज संप्रेषणाचा हेतू निर्मूल होत असल्याने भाषेचा विकास याउलट भाषासंधारणाखेरीज ज्ञाननिष्पत्ती होणे अवघड आहे. त्यामुळे कालिदासाच्या उक्तीचे सार लक्षात घेऊन ज्ञाननिष्पत्ती आणि भाषेचा उद्‌गम, संधारण आणि विकास या गोष्टी परस्परावलंबी आहेत, अशी भूमिका घेतल्यास या दोनही क्षेत्रांतील अनेक जटिल समस्यांना विशेषतः संकल्पनांचा उगम, स्वरूप आणि कार्य यासंबंधीच्या काटेरी प्रश्नांना समाधानकारक उत्तरे देता येऊ शकतील.

ज्ञानाच्या उद्‌गम आणि विकास या प्रक्रियांतील संकल्पनांचे (ideas, forms, concepts वगैरे वगैरे) महत्त्व कुणी नाकारत नाही; पण प्रत्यक्षात मात्र त्यांचे फारसे विवेचन न करता त्यांचे अस्तित्व, कार्य आणि अमूर्तता अभ्यासकांना आधीच माहीत आहेत, असे गृहीत धरून पुढचे विवेचन केले जाते. आता प्लेटो आणि ॲरिस्टॉटल या दोघांच्याही तत्त्वज्ञानात संकल्पनांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे; पण खुद्द प्लेटोच्या





अनुक्रमणिका

युक्तिवादानुसार त्यांचे अस्तित्व हा सिद्ध करण्याचा किंवा निदान विवेचनाचा भाग नसून, तो एक वाटण्याचा किंवा मानण्याचा (assumption) भाग आहे. 'अनेक वस्तूंना एक सामान्य नाम आहे, असे दिसते, तेव्हा आपण तदनुसारी संकल्पनेचे अस्तित्व मानू लागतो'. अशी प्लेटोची भूमिका असावी.[३]

वास्तविक एक संकल्पना अनेक ठिकाणी प्रकट होत असल्याने आपण तिला एक जातिवाचक संज्ञा देतो, असे प्रतिपादन करणे जास्त सुसंगत असताना प्लेटोने मात्र एक जातिवाचक नाम अनेक ठिकाणी आढळल्याने तिथे तदनुसारी संकल्पनेचे अधिष्ठान ठेवले, अशी ही नाथाच्या घरची उलटी खूण दिसते.

नामान्वयी संकल्पनांना अथवा आकारांना (forms) ऐंद्रिय अनुभूतिगम्य अशा (जड) वस्तूंव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व आहे, ही प्लेटोची भूमिका ॲरिस्टॉटलने नंतर लगेच खोडून काढली. त्याच्या निष्कर्षाप्रमाणे अनुभूतिगम्य, आकारबद्ध, जड अशा द्रव्यालाच अस्तित्व आहे, असे म्हणावे लागते. इतकेच नव्हे, तर द्रव्य आणि आकार यांची फारकत करणे सुद्धा अशक्य आहे.[४]

ॲरिस्टॉटलचे हे मूलगामी विचार प्रस्तुतच्या चर्चेला अतिशय उपयुक्त आहेत. त्याप्रमाणे त्यांचा उपयोग केलाही जाईल, हे खरे, पण त्यानेसुद्धा संकल्पनांच्या उद्‌गम, प्रकृती, विकास वगैरे विषयांचा ऊहापोह केल्याचे दिसत नाही.

प्लेटोचा कल्पनावाद पराकोटीच्या टोकाला नेणारा तत्त्वज्ञ बर्कली याने हे स्पष्ट केले की पदार्थांची म्हणून समजली जाणारी अनुभूती ही वास्तविकतः त्याच्या गुणधर्मांची (attributes) अनुभुती असून, या गुणधर्मांव्यतिरिक्त असा स्वतंत्र पदार्थ ऐंद्रिय अनुभूतीत कधीही उपलब्ध होत नाही.[५]

आधुनिक पदार्थविज्ञान तर त्याहीपुढे जाऊन वस्तूला गुणधर्मही नसतात, तर ते पदार्थाच्या आणि ज्ञानेंद्रियांच्या परस्परसंघाती प्रक्रियेचे परिपाक असतात, असे प्रतिपादन करते.[६] बर्कलीने गुणधर्मातिरिक्त जड द्रव्याचेच अस्तित्व नाकारले आणि कल्पनावाद टोकाला नेला. त्याच्या या विचारांची फारशी गंभीर दखल पुढच्या विचारवंतांनी घेतली नाही, हे खरे, पण त्यामुळे ज्ञान आणि भाषा यांच्या विवेचनातही एक मोठी त्रुटी निर्माण झाली. त्याच्या सारभूत विचारांचा वापर करून नाम म्हणजे काय, 'कल्पना म्हणजे काय, ज्ञानसंधारण होण्यात कल्पनांचे कार्य काय असते, व्याख्या कशा तयार होऊ शकतात, प्रत्यक्ष अनुभूतिगम्य सृष्टी आणि भाषिक / ज्ञानीय व्यवहार यांचे परस्परसंबंध काय आहेत किंवा असावे, इत्यादी अनेक जटिल प्रश्नांना उत्तरे देण्याचा प्रयत्न करता येईल. हा प्रयत्न या निबंधाच्या तिसऱ्या भागात करण्यात येईल.

१.२) भाषेतील सूक्ष्मतम अर्थवाही घटकांना रूपिम (Morpheme) अशी संज्ञा आहे. ते बद्ध आणि स्वतंत्र अशी दोन्ही स्वरूपांत सापडतात उदा., 'पंखा' हा एक स्वतंत्र रूपिम आहे कारण तो,

*मी एक पंखा विकत घेतला*

*तो पंखा चांगला नाही*

यांसारख्या वाक्यरचनांत एक स्वतंत्र एकक म्हणून वावरू शकतो. याउलट पंख्याला या शब्दातील ला हा रूपिम बद्ध आहे, कारण तो नेहमी पंख्याला, झाडाला, रमेशला वगैरेंसारख्या अन्य स्वतंत्र रूपिमांना जोडूनच वापरता येतो. नुसताला ला रूपिम एक स्वतंत्र एकक म्हणून वाक्यात वापरता येत नाही. स्वतंत्र आणि बद्ध या सर्वच रूपिमांना शब्द ही संज्ञा द्यावी, की नाही, हा वादाचा मुद्दा आहे. तथापि, भाषा, जगत आणि कल्पना या विषयांचे अनेक अभ्यासक त्यांच्या विवेचनात शब्द हीच संज्ञा ठिकठिकाणी वापरताना आढळतात, त्यामुळे या सर्व रूपिमांचा या विवेचनातही 'शब्द' याच संज्ञेने उल्लेख केलेला आहे.

शब्द या अर्थवाही घटकाला त्याचा अर्थ कसा प्राप्त होतो, यावर अनेक मतभेद आहेत. उदा., निर्देशवादी (Referential theorists) असे मानतात, की जड वस्तूंना भाषा आणि विचार यांच्याव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व आहे. या जड वस्तूंचा भाषाव्यवहारात निर्देश होत असतो. उदा., टेबल या शब्दाने एक लाकडी वस्तू निर्देशित होते. टेबल या शब्दाने जी संकल्पना प्रतीत होते, जिला संस्कृत तर्कशास्त्रज्ञ जाति म्हणतात किंवा जिला इंग्रजीत class, concept या संज्ञा वापरता येतील, ती संकल्पना म्हणजे तिचा अर्थ आहे. यामुळे मूर, रसेल, प्रभृती तत्त्वज्ञांच्या प्रभावाखालील विवेचक त्यांचा उल्लेख referent आणि sense या संज्ञांनी करतात.[७] रेफरंट म्हणजेच सेन्स असा मात्र प्रकार नव्हे. तसे म्हटले, तर फारच आपत्ती ओढवेल. उदा.,

वेव्हर्लीचा लेखक = वॉल्टर स्कॉट

हे सत्य आहे. पण म्हणून वेव्हर्लीचा लेखक या वाक्ययोगाचा अर्थ वॉल्टर स्कॉट किंवा वॉल्टर स्कॉट याचा अर्थ वेव्हर्लीचा लेखक असे म्हणणे शक्य नाही. कारण वॉल्टर स्कॉट या नावाने एका व्यक्तिविशेषाचा उल्लेख होतो तर वेव्हर्लीचा लेखक या वाक्यप्रयोगाने वेव्हर्ली या कादंबरीच्या लेखकाचा निर्देश होतो. या दोन्ही व्यक्ती एकच आहेत – किंवा होत्या - हा ऐतिहासिक अपघात आहे. मूलतः या दोन्ही वाक्यप्रयोगांनी ज्या कल्पनांचा बोध होतो, त्या कल्पनांमध्ये सहस्थितीचे नाते (Relation of identity) प्रस्थापित झाल्याने स्कॉट आणि वेव्हर्लीचा लेखक यांमध्ये समीकरण मांडता आले. अन्यथा

त्यांचे निर्देश (Referents) भिन्नच आहेत.

निर्देश म्हणजेच अर्थ (Referent as meaning) हे तत्त्व गृहीत धरून, आल्स्टन यांनी सी. एस्. पिअर्स आणि प्रॅग्मॅटिझम या शास्त्राचा संबंध जोडताना कशा आपत्ती ओढवतील, यांचा विचार मांडलेला आहे. सी. एस्. पिअर्स हे विख्यात विचारवंत प्रॅग्मॅटिझमचे जनक होते. त्याप्रमाणेच ते हार्वर्ड येथे सुद्धा भाषणे देत आणि वर्तमानपत्रांत लेख प्रसिद्ध करीत असत. त्यांनी आयुष्यात दोन विवाह केलेले होते. आता

सी. एस्. पिअर्स = प्रॅग्मॅटिझमचे जनक

असे सत्य मांडल्यावर असा निष्कर्ष काढावा लागेल, की प्रॅग्मॅटिझमचे जनक या वाक्यप्रयोगाच्या अर्थाने त्याच्या आयुष्यात दोन विवाह केले होते.

पण आल्स्टन यांनी निर्देशवादावर घेतलेल्या तात्त्वज्ञानिक आक्षेपात अव्याप्तीचा दोष येतो, त्यामुळे त्यांचे आक्षेप सबळ नाहीत. वॉल्टर स्कॉट किंवा पिअर्स या व्यक्तींनी कादंबऱ्या लिहिणे किंवा दोन विवाह करणे या गोष्टींनी त्यांच्या व्यक्तिमत्त्वांचा निखिल (total) निर्देश होत नाही. स्कॉट यांनी इतरही अनेक कादंबऱ्या लिहिल्या. ते प्रख्यात कवी होते. तसेच पिअर्स यांनी मांडलेला प्रॅग्मॅटिझम हाही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक पैलू होता. त्यामुळे त्यांच्या अनेक पैलूंपैकी एका पैलूचा निर्देश करणाऱ्या वाक्प्रयोगाने संपूर्ण व्यक्तिसंचाचा निर्देश होतो, हे म्हणणे असंगत आहे.

आणि म्हणून A = B, B = C, A = C म्हणजेच

A // \\ B = C

असे म्हणणे तर्कशास्त्रात किंवा गणितात ठीक आहे, कारण ती आकारिक (formal) शास्त्रे आहेत; पण

प्रॅग्मॅटिझमचा उद्गाता = सी. एस्. पिअर्स

हे पूर्ण आकारिक समीकरण नाही. ते मांडताना

प्रॅग्मॅटिझमचा उद्गाता = सी. एस्. पिअर्स
|| 
\\ दोन विवाह करणारा

असे मांडण्याऐवजी

प्रॅग्मॅटिझमचा उद्गाता .................. दोन विवाह करणारा
||
= सी. एस. पिअर्स





अनुक्रमणिका

असे मांडायला हवे. कारण प्रॅग्मॅटिझमचा उद्गाता आणि दोन विवाह करणारा यांचा एकमेकांशी अप्रतिहत (immediate) असा संबंध नाही, तर तो सी. एस. पिअर्स या वाक्प्रयोगाने प्रतिहत (mediated) झाला आहे. त्यामुळे

प्रॅग्मॅटिझमचा उद्गाता याचा अर्थ दोन विवाह करणारा असा लावणे पूर्णपणे अशक्य आहे.

याआधीच्या परिच्छेदात मांडल्याप्रमाणे स्कॉट किंवा पिअर्स या व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वातील अनेक पैलूंपैकी काही पैलूंचा निर्देश करणाऱ्या वाक्प्रयोगांनी एकाच व्यक्तीचा निर्देश झाला, तरी ते वाक्प्रयोग एकमेकांचे अर्थ आहेत, असे म्हणता येणार नाही. Ontologically आणि epistemologically स्कॉट आणि पिअर्स हे अनेक गुणधर्मांचे आणि तदनुसारी संकल्पनांचे संच आहेत, असे म्हणता येईल. त्यामुळे त्यातील एका अर्थाचा अर्थ दुसरा अर्थ आहे, असे म्हणण्यासारखे चमत्कारिक विधान त्यातून जन्माला येईल.

निर्देशवादाचे भाबडे वाटणारे अणि काही अंशी भाबडे असणारे मूलतत्त्व नाकारताना काही मूलभूत प्रश्न उपस्थित होतात. उदा., एखाद्या वाक्प्रयोगाने ज्या वस्तूचा किंवा व्यक्तीचा निर्देश होतो, ती व्यक्ती / ती वस्तू काही काळ पंच–इंद्रियगम्य (यात मनाचा समावेश नाही) अशा अवस्थेत काही काळ जड जगतात वावरत असणे हे प्रत्येक वेळेला म्हणणे कितपत सयुक्तिक आहे? भाषाव्यवहाराच्या दृष्टीने स्कॉट, पिअर्स आणि लुई कॅरलची ॲलिस यांत काही फरक पडत नाही, तो का? प्रत्येक संकल्पनेला रेफरंट असणे आवश्यक नाही, हे मान्य झाले, तरी ऐंद्रिय अनुभूतींच्या कक्षा आणि स्वरूप यांच्या चौकटीतून जगताचे सम्यक्दर्शन होऊ शकते का? सरतेशेवटी भाषिक व्यवहाराने अर्थाचा निर्देश किती प्रमाणात सयुक्तिक ठरू शकतो हा प्रश्न दुसऱ्या भागात विचारात घेता येईल.

पण तत्पूर्वी असे नमूद करणे आवश्यक आहे, की ज्या वेळी लोकमान्य टिळकांनी गीतारहस्याचा एक शब्दही लिहिलेला नव्हता, त्या काळातही बाळ गंगाधर टिळक या वाक्प्रयोगाला काही अर्थ होताच. त्यामुळे

टिळक = गीतारहस्याचे लेखक

असा अर्थ त्या काळी उपपन्न झाला नव्हता. काही वेळा

टिळक = गंगाधर पंतांचे कुलदीपक किंवा

टिळक = मराठाचे संपादक

इत्यादी अर्थ सांगणे शक्य होते. पण आतापर्यंतच्या विवेचनाची दिशा लक्षात घेता एका वाक्प्रयोगाचा अर्थ दुसऱ्या वाक्प्रयोगाने नमूद करणे ही भाषाव्यवहारोपयोगी व्यवस्था म्हटली, तरी वस्तुस्थिती नाही, असे म्हणावे लागते. अशा वेळी निर्देशवादाचे मूलतत्त्व





अनुक्रमणिका

संपूर्ण नाकारण्यासाठी काही सबळ तात्त्वज्ञानिक कारण उपलब्ध होत नाही.

१.३) निर्देशवादाचे मूलतत्त्व नाकारण्याची गरज असण्याचे प्रमुख कारण तात्त्वज्ञानिक नसून भाषावैज्ञानिक आहे. अमुक एका शब्दाचा अर्थ अमुक एक वस्तू आहे, असे विधान केल्यास तो शब्द आणि त्याचा अर्थ यांत साक्षात परस्परसंबंध आहे, असे उपपन्न होईल. त्याला धार्मिक किंवा गूढवादासारखे वलय प्राप्त होते. उदा., देवाने सर्व वस्तू निर्माण केल्यानंतर त्यांना नावे दिली, ही ख्रिश्चनधर्मीयांची श्रद्धा किंवा भारतीयांचा स्फोटसिद्धांत यांची हीच जातकुळी आहे. त्यामुळे शब्द आणि अर्थ यांचा परस्परसंबंध सहज किंवा सहजात, coeval, नैसर्गिक, नित्यमुक्त (concomittant) अपरिवर्तनीय, नित्य आणि सर्वत्र आहे, असे म्हणावे लागेल. असे म्हटले, तर आणि तरच वस्तुत्व आणि अर्थवत्त्व एकत्र उपपन्न होतील.

पण शब्द आणि अर्थ यांचा साक्षात संबंध आहे, असे म्हणणे अशक्य आहे, कारण एकाच पाणी या द्रव्यासाठी पाणी, wasser, water, eau, मिन्ने, पानीयम्, नीर वगैरे अनेक शब्द अनेक भाषांमध्ये उपलब्ध होतात. अनेक ध्वनी किंवा ध्वनिसट एकाच पदार्थाचा निर्देश करू लागले, तर कोणत्याही ध्वनिसटाचा काहीही अर्थ होईल. त्यामुळे परस्परविरुद्ध अर्थाचे शब्द सुद्धा समानार्थक आहेत / असू शकतात, असे म्हणण्याची आपत्ती ओढवेल. प्रत्यक्ष भाषांमध्ये असे सहसा होत नाही; कारण त्या भाषेतील नियमबद्ध रचना त्याला अटकावतात. अन्यथा भाषा व्यवहारात अर्थव्यक्तीकरणाच्या यंत्रणेला काही वाव उरणार नाही.

यासाठी भाषावैज्ञानिक भाषा ही मुळातच arbitrary आहे, असे मानतात. ऐंद्रिय अनुभूतीतील जड द्रव्य निर्देशित करण्यासाठी ध्वनिरूप किंवा ध्वनिसटरूप असे शब्द प्रतीके म्हणून वापरली जातात.[१] आता प्रतीके काय असावीत, हा वापरणाऱ्यांच्या मर्जीचा भाग आहे. काळा रंग हा कावळ्याच्या अस्तित्वाचा आवश्यक पण पुरेसा नाही (necessary but not sufficient) असा घटक आहे. तीन बाजू असणे हा त्रिकोणाच्या अस्तित्वाचा आवश्यक आणि पुरेसा घटक (necessary and sufficient) आहे. पण त्रिकोणाचा किंवा कावळ्याचा निर्देश करणारे ध्वनिसट आणि त्यांचे अर्थ यांच्यांत necessary and sufficient असे काही नाही. त्यामुळेच त्यांसाठी कावळा, काक, crow किंवा त्रिकोण, triangle वगैरेंसारखे वेगवेगळे ध्वनिसट वापरता येऊ शकतात.

याप्रमाणे शब्द प्रतीकरूपाने वापरले जातात, असे म्हटले, म्हणजे त्या शब्दांच्या वापरासाठी जे नियम बसवले जातील, त्यांनुसार त्या त्या भाषेचा संघात घडत जाऊन त्यातील नियमबद्धतेमुळे विरुद्ध अर्थाचे शब्द सुद्धा एकाच वेळी एकाच संदर्भात समानार्थी

होतील ही शक्यता नष्ट होते. त्यामुळे या शब्दांना प्राप्त होणारे अर्थ कोणत्या प्रक्रियांनी आणि कोणत्या नियमांच्या आधारे प्राप्त होतात, हे शोधणे हे आपले काम आहे. या शब्दांना अर्थवाहित्व कसे येते, यासंबंधी भाषवैज्ञानिकांनी मांडलेल्या विचारांचा ऊहापोह या निबंधाच्या दुसऱ्या भागात करण्यात येईल.

**भाषाशिक्षण विभाग, सेंटर ऑफ एज्युकेशन, एस्.एन्.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई - ४०० ०२०.**

---

टीपा

१) पदार्थाची अनुमानगम्यता फार पुरातन काळापासून ज्ञात झालेली आहे. पाहा :

यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति तदेव ब्रह्म त्वं विद्धि

येन श्रोत्रमिदं श्रुतम् तदेव ब्रह्म त्वं विद्धि

इत्यादी इत्यादी

२) बालकांच्या भावना व्यक्त करण्यासाठी वापरले जाणारे ध्वनी हे त्यांच्या भाषाव्यवहाराचा भाग मानल्यास भाषा अनुभूतिगामी ठरवावी लागेल. प्रत्यक्षात बालकांनी हेतुतः प्रतीकरूपाने वापरलेले ध्वनी आणि त्यांनी अजाणता वापरलेले ध्वनी (म्हणजे ज्याला आपण भाषा म्हणू शकणार नाही) यांची सीमारेषा अत्यंत धूसर आहे. त्यामुळे सध्याच्या परिस्थितीत दुसरा सज्जड पुरावा मिळेपर्यंत भाषा आणि अनुभूती परस्परावलंबी आहेत, असे म्हणायला हरकत नाही.

3) "Whenever a number of individuals have a common name, we assume them to have a corresponding idea or form" – Republic Book X

4) "By form I mean the essence of each thing and its primary substance."

"And so one might even raise the question whether the words 'to walk', 'to be healthy, 'to sit' imply that each of these things is existent, ............ for none of them is self-subsistent or capable of being separated from substance; but rather if anything, it is *that which walks or sits or is healthy that is an existent thing.*" (इटॅलिक्स माझे)

"So that clearly no universal exists apart from its individuals" – Metaphysica Book I

5) "For as to what is said of the absolute existence of unthinking things without any relation to their being unperceived, that seems perfectly unintelligible."

"the objects of human knowledge are either ideas ........ "
(बर्कलीचे हे विधान या निबंधाच्या तिसऱ्या भागात विशेषत्वाने वापरावे लागेल. तिथे त्याचा पूर्ण विचार होईल.)

६) पाहा : The Nature of Physical Reality या सर आर्थर एडिंग्टन यांच्या ग्रंथातील पहिले प्रकरण.

7) The question is ".... not who is the individual meant but what is relation of the word to the individual which makes the one mean the other" – Bertrand Russell (1921) Analysis of mind, George Allen & Unwin, London P-191

८) पाणी या अर्थाचा मिन्ने हा शब्द मिन्नेसोटा किंवा मिनेसोटा, मिन्नेपोलिस या शब्दांत आढळतो.

९) प्रतीके वापरताना एखाद्या वस्तूचे नाम आणि तिचे विशेषण यांत काही categorywise फरक आहे की नाही, असा मुद्दा इथे येऊ शकतो. उदा., गिरीश नावाने पर्वतांचा राजा असणाऱ्या व्यक्तीचा उल्लेख होतो, तसा गिरीश नावाच्या व्यक्तीचाही उल्लेख होतो. अशा वेळी एकच प्रतीक नाम (reference) आणि वर्णन (description/meaning) या दोन्ही प्रकारची कार्ये करताना आढळेल. पण मग वेव्हर्लीचा लेखक हा वाक्प्रयोग नाम या अर्थाने का वापरू नये? हे शब्द वापरतानां भाषा व्यवहाराच्या दृष्टीने तरी काही फरक पडणार नाही. मी त्यात गृहीत धरलेला फरक हा प्रामुख्याने epistemological आणि नंतर logical आहे. त्यामुळे काही विशेष कारण दृष्टिपथात नसताना गिरीश हे वर्णन मानू नये, तर वेव्हर्लीचा लेखक हे नाम मानू नये, असे मला वाटते.

●●●



अनुक्रमणिका

# कायद्याचा अनुवाद : गरज, त्यामधील अडचणी व उपलब्ध अनुवादांचे मूल्यमापन

सत्त्वशीला सामंत

**गरज :** महाराष्ट्र राज्याच्या विधिमंडळाने १९६५ साली 'महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४' हा कायदा संमत करून, त्याच्या कलम ५ अन्वये, 'नेमलेल्या दिवसांपासून राज्य सरकारचे सर्व कायदे मराठीतून करण्यात येतील', असे जाहीर केले. परंतु हा 'नेमलेला दिवस' कोणता असणार, त्याविषयी एक टीप देण्यात आली व राज्य शासन एक अधिसूचना काढून ती तारीख जाहीर करील, असे तीत म्हटले. हे कलम लगेच अमलात न आणण्यामागील हेतू स्तुत्य होता. मूळ कायदा मराठी भाषेतून करता येण्याइतपत मराठीची पूर्वतयारी करण्यास पुरेसा अवधी मिळावा, असा इरादा होता. परंतु गेली ३० वर्षे नाना सबबी सांगून महाराष्ट्र शासनाच्या विधी व न्याय विभागाने हे कलम अमलात येऊ दिले नाही. तथापि, उशिरा का होईना, अलीकडेच मराठीच्या नशिबी तो भाग्ययोग आला. विद्यमान सरकारने अलीकडेच एक अधिसूचना काढून ता.१५ ऑगस्ट, १९९५ पासून हे कलम अमलात येईल, असे जाहीर केले आहे. महाराष्ट्र सरकार त्याबद्दल अभिनंदनास पात्र आहे. याचा अर्थ असा की, यापुढे महाराष्ट्र विधिमंडळाने केलेल्या कायद्यांची मूळ भाषा मराठी राहणार आणि इंग्रजी व हिंदी या अनुवाद-भाषा होणार आहेत. म्हणजेच यापुढे राज्य कायद्यांपुरती तरी कायद्यांचा मराठीत अनुवाद करण्याची (तत्त्वतः) गरज पडणार नाही.

तथापि, भारतासारख्या बहुभाषिक देशात कोणती तरी एक भाषा ही कायद्याची मूळ भाषा राहते व इतर भाषांना अनुवाद-भाषांचा दर्जा मिळतो व अशा देशात अनुवादांची गरज कायम असते. केंद्रीय कायद्यांच्या संबंधात सांगायचे, तर मराठी ही त्यांची मूळ भाषा कधीच होणार नाही व त्यांच्यापुरती तरी ती अनुवाद-भाषा राहणार आहे. त्यामुळे केंद्रीय कायद्यांचे मराठीतून अनुवाद करावे लागणार आहेत. म्हणूनच हे अनुवाद जास्तीत जास्त सुभग व अर्थदृष्ट्याही काटेकोर कसे होतील, याचा विचार करणे अपरिहार्य ठरते.

**त्यामधील अडचणी :**

कायद्याच्या मूळ मसुद्याला इंग्रजीत authoritative text म्हणजे 'प्रमाण पाठ' असे म्हणतात, तर त्याच्या सरकारमान्य अनुवादाला authorised translation





अनुक्रमणिका

म्हणजे 'प्राधिकृत अनुवाद' असे म्हणतात. याचा अर्थ असा की, अनुवाद-भाषेतील मसुद्यामधील एखाद्या शब्दयोजनेच्या अन्वयार्थाबाबत वाद वा शंका उपस्थित झाल्यास, कायद्याचा मूळ भाषेतील पाठ्य प्रमाण समजावा. कायद्याचा मूळ मसुदा तयार करणे व त्याचा अनुवाद करणे या दोहोंमध्ये एक स्पष्ट सीमारेषा आहे. पहिल्या बाबतीत कायद्याचा मसुदाकार स्वतःच्या मनातला अभिप्राय उत्तम रीतीने व्यक्त करू शकतो. दुसऱ्या बाबतीत, मसुदाकार व अनुवादक या दोन व्यक्ती बहुधा वेगवेगळया असतात. त्यामुळे अनुवाद करणाऱ्यावर तीन जबाबदाऱ्या येतात.

१) मूळ मसुदाकाराचा नेमका अभिप्राय काय, याचे यथार्थ आकलन करणे;

२) तो अभिप्राय अनुवाद-भाषेत काटेकोरपणे मांडणे ; व

३) त्याच वेळी अनुवाद-भाषेचा डौल सांभाळणे.

मूळ अभिप्रेत अर्थाशी तंतोतंत प्रामाणिक राहण्यासाठी शब्दनिष्ठ अनुवाद केल्यास, कित्येकदा अनुवाद-भाषेचा डौल बिघडतो. अनुवाद भाषेचा डौल सांभाळण्याच्या नादात कधी कधी अर्थाच्या काटेकोरपणाला ढळ पोचतो व अनुवादात कधी अव्याप्तीचा, तर कधी अतिव्याप्तीचा दोष उद्‌भवतो. म्हणून कायद्याचा अनुवाद करताना, अनुवादकाला मूळ कायद्याचा काटेकोरपणा व अनुवाद-भाषेचा डौल या दोन्ही डगरींवर आपले पाय घट्ट रोवावे लागतात.

अनुवादकाची जबाबदारी येथेच संपत नाही. कायद्यात वारंवार दुरुस्त्या होत असतात. सद्यःस्थितीत प्रथम इंग्रजीतील कायदा दुरुस्त होतो व मग अनुवादात दुरुस्ती होते. मूळ अनुवाद जर पुष्कळ भाषा-स्वातंत्र्य घेवून केलेला असेल, तर अनुवादात दुरुस्त्या करणाऱ्याची जबाबदारी वाढते, त्याला बरीच अवधाने सांभाळावी लागतात. घाईगर्दीत एखाद्या ठिकाणी दुरुस्ती करण्याचे राहून जाते. परिणामी, अनुवाद कितीही सुभग असला, तरी त्यात अर्थाची हानी झाल्यास तो अनुवाद व्यर्थ ठरतो. म्हणूनच कायद्याचा अनुवाद हा मूळ कायद्याइतकाच प्रमाण ठरवणे धोक्याचे असते.

सारांश, कायद्याचे भाषांतर करताना, शक्य तो चुकांना वाव राहू नये, यासाठी प्रथमतः अर्थनिष्ठता, नंतर शब्दनिष्ठता व मागाहून भाषासौंदर्य हा तत्त्वक्रम पाळून भाषांतर करणे अपरिहार्य ठरते. पण प्रत्यक्ष अनुवाद करताना अनुवादकाला या तीनही गोष्टींचे अवधान एकदमच सांभाळावे लागते.

संविधानातील अनुच्छेद ३४८ (२) (बी) अनुसार केंद्रीय कायद्यांचा इंग्रजी मसुदा हाच प्रमाण असला, तरी 'राजभाषा अधिनियम १९६३' द्वारे त्यांचा हिंदी अनुवादही प्रमाणपाठ ठरवण्यात आला आहे.

त्यानंतर संसदेने 'Authorised Translations (Central Laws) Act, 1973' संमत केला. त्यानुसार सर्व राज्यांच्या अधिकृत राजभाषांमधील केंद्रीय अधिनियमांचे अनुवाद हे अधिकृत अनुवाद म्हणून जाहीर करण्यात आले. परंतु अलीकडेच त्याच्या शीर्षकात दुरुस्ती करण्यात येऊन 'Authorised Tranlation'

या शब्दप्रयोगाऐवजी 'Authoritative Text' अशी शब्दयोजना करण्यात आली. त्यामुळे प्रादेशिक भाषांमधील अधिकृत अनुवादांनाही मूळ कायद्याइतकाच प्रमाण दर्जा मिळाला आहे. परंतु अनुवादांना केवळ कायद्याने असा दर्जा मिळाल्याने कार्यभाग होणार नाही. हे अनुवाद त्या त्या राज्यांमध्ये ज्या यंत्रणांमार्फत होतात, त्यांमध्ये सर्वथैव पात्रतेचे अनुवादक आहेत काय, याची खातरजमा करावी लागेल. आजही केंद्र सरकारच्या विधी व न्याय मंत्रालयात कायद्यांचा मसुदा प्रथम इंग्रजीतून केला जातो व नंतर तो हिंदीत भाषांतरित केला जातो. परंतु विधीन्याय मंत्रालयाच्या हिंदी विभागातील अनुवादकांकडून इंग्रजी प्रारूपकारांइतकीच शैक्षणिक अर्हता अपेक्षिली आहे व त्यांना वेतनमान, इ. बाबतींत समान दर्जा दिलेला आहे. तसेच, त्यांना 'अनुवादक' या पदनामाऐवजी 'प्रारूपकार' असेच संबोधिले जाते. एवढी आदर्श परिस्थिती असतानाही प्रत्यक्षात हिंदी अनुवादांचा एकंदर दर्जा समाधानकारक आहे की नाही, याबद्दल मला स्वत:ला शंका आहे. पण आताच्या चर्चेचा तो प्रस्तुत विषय नव्हे.

महाराष्ट्र राज्यामध्ये याउलट काय परिस्थिती आहे, त्याचा आढावा घेणे उद्‌बोधक ठरेल. १९७० सालानंतर महाराष्ट्र राज्यात केंद्रीय योजनेनुसार आधुनिक स्वरूपात केंद्रीय अधिनियमांचा अनुवाद करण्याचे काम एका तज्ज्ञ विधी समितीच्या मार्गदर्शनाखाली भाषा संचालनालयात सुरू झाले. अर्थात् हजारो केंद्रीय अधिनियम आतापर्यंत संमत झाले आहेत. पण त्या सर्वांचे क्रमशः भाषांतर करणे आता केवळ अशक्य आहे व तसे करणे व्यवहार्यही नाही. म्हणून केंद्र सरकारने महत्त्वाच्या केंद्रीय अधिनियमांच्या अग्रक्रम सूच्या तयार करून पाठवल्या. त्या नुसार सुमारे १० वर्षे काम चालले. संविधानासकट जवळ जवळ सर्व महत्त्वाच्या केंद्रीय अधिनियमांची भाषांतरे पूर्ण होऊन प्रसिद्धही झाली आहेत. परंतु १९८० सालानंतर विधी समिती विसर्जित करण्यात आली. तोवर भाषा संचालनालयातील कर्मचारी वर्गाची काय परिस्थिती होती? महाराष्ट्र सरकारच्या विधी-न्याय विभागातील प्रारूपकारांच्या शैक्षणिक पात्रतेचा अनुवादवर्ग भाषा संचालनालयात नव्हता. त्यांना त्यांच्याप्रमाणे दर्जाही नाही व वेतनमानही नाही. सुरुवातीला दहा वर्षे तज्ज्ञ विधी समितीचे मार्गदर्शन लाभल्यामुळे अनुवादाला एकंदरीत गुणवत्ता होती. पण १९८० सालापासून कोणाही तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाअभावी पुढील काम चालले आहे. त्यामुळे त्यांनी केलेल्या केंद्रीय कायद्यांचा अनुवाद हा कायद्यातील तरतुदीनुसार प्रमाण दर्जाचा ठरवण्यात आला असला, तरी प्रत्यक्षात तो तसा आहे काय, ही वस्तुस्थिती तपासून पाहावी लागेल.

केंद्र सरकारच्या विधी-न्याय मंत्रालयासारखी आदर्श परिस्थिती महाराष्ट्र राज्यात निर्माण केली, तरी तेवढ्या पात्रतेचे सुयोग्य अनुवादक मिळणे ही एक कष्टसाध्य बाब आहे. कोणत्याही प्रकारचा अनुवाद करणाऱ्याच्या अंगी किमान दोन अर्हता असणे आवश्यक असते. एक म्हणजे ज्या भाषेतून अनुवाद करावयाचा, त्या भाषेवर त्याचे

प्रभुत्व नसले, तरी तिचे आकलन चांगले असावयास हवे आणि त्याचबरोबर तो आशय अनुवाद-भाषेत सुभग लेखनशैलीत मांडण्याची कुवतही त्याच्या अंगी असावसाय हवी. कायद्यांच्या अनुवादांच्या बाबतीत, या किमान अर्हतांच्या जोडीला अनुवादकाकडे कायद्याची पदवी असली, तर अर्थात् 'सोनेमें सुगंध' म्हणतात, त्याप्रमाणे अनुवाद अधिक सरस होऊ शकेल. याउलट, असे सांगता येईल, की जो जो कायद्याचा पदवीधर असेल, त्या प्रत्येकाला अनुवादाचे काम सहज जमेल, असे नव्हे, कारण अनुवाद हे शास्त्रही आहे व कलाही आहे. भाषा संचालनालयात असे काही अनुवादक आहेत, की जे कायद्याचे पदवीधर नसूनही अनुवाद-कौशल्याच्या जोरावर व सरावाने उत्तम अनुवाद करू शकतात. परंतु आदर्श विधी अनुवादक घडवण्यासाठी अनुवादक म्हणून किमान गुणवत्ता, कायद्याची पदवी व थोडेसे प्रशिक्षण आणि अखेरीस सराव या सर्व गोष्टी आवश्यक आहेत. मात्र जोवर अनुवाद-कार्य हे दुय्यम दर्जाचे काम समजले जात आहे तोवर या परिस्थितीत बदल होण्याची शक्यता नाही.

**उपलब्ध अनुवादांचे मूल्यमापन :**

या ठिकाणी स्वातंत्र्योत्तर काळात सरकारी यंत्रणेमार्फत झालेल्या अनुवादांचाच विचार प्रस्तुत ठरतो. स्वातंत्र्यपूर्व काळापासून ते महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेपर्यंत महाराष्ट्र सरकारच्या विधी व न्याय विभागात एक अनुवाद-कक्ष होता व त्याच्यामार्फत केंद्रीय व राज्यकायद्यांचे अनुवाद होत असत. तथापि, तेव्हा या अनुवादांना एक तर मूळ कायद्याइतका दर्जा नव्हता व तितका काटेकोरपणा अपेक्षितही नव्हता. सर्वसाधारणपणे जनतेच्या माहितीसाठी सोप्या भाषेत हे अनुवाद प्रसिद्ध व्हावेत, असा प्रयत्न केला जात असे. या कामावर कोणा तज्ज्ञ समितीची देखरेखही नव्हती. कर्मचारी यंत्रणेकडूनच हे अनुवाद केले जात.

परंतु १९६० साली हा अनुवाद-कक्ष नव्याने स्थापन झालेल्या 'भाषा संचालनालय' या कार्यालयाकडे हस्तांतरित झाला. राजभाषा म्हणून मराठीचा विकास घडवून आणण्याचे महत्त्वाचे कार्य या विभागाकडे सोपवण्यात आले होते. कायद्यांचा अनुवाद हे त्यांपैकी एक महत्त्वाचे अंग होते. परंतु केंद्रीय कायद्यांचे अनुवाद व राज्य कायद्यांचे अनुवाद यांसाठी वेगवेगळया यंत्रणा निर्माण करण्यात आल्या; ही दोन्ही कार्ये समांतर पद्धतीने चालत राहिली व त्या दोहोंत एकसूत्रता राहिली नाही, किंबहुना काही व्यावहारिक अडचणींमुळे ते शक्यही झाले नाही.

केंद्रीय अधिनियमांपुरते सांगायचे, तर त्या कामासाठी भाषा संचालनालयात एक कक्ष उघडण्यात आला व एका तज्ज्ञ विधिसमितीच्या मार्गदर्शनाखाली हे काम सुरू झाले. आधी उल्लेख केल्याप्रमाणे, केंद्र सरकारने पाठवलेल्या अग्रक्रम सूच्यांनुसार महत्त्वाचे अनुवाद हाती घेण्यात आले. आतापर्यंत १५० हून अधिक अनुवाद झाले आहेत व त्यांमध्ये भारतीय संविधान, भारतीय दंड संहिता, फौजदारी प्रक्रिया संहिता, दिवाणी प्रक्रिया संहिता, भारतीय साक्षीपुरावा अधिनियम, अशांसारख्या सर्व मूलभूत

कायद्यांचा अनुवाद झाला आहे. हे अनुवाद तज्ज्ञांच्या मागदर्शनखाली झाले असल्याने, अर्थदृष्ट्या बहुतांशी निर्दोष आहेत. एक तर हे अनुवाद पूर्ण करण्यासाठी ठरावीक कालमर्यादा नव्हती, त्यामुळे समितीच्या सदस्यांना त्यांच्यावर सखोल चर्चा करण्यास सवड मिळाली. सुरुवातीच्या काळात नव्याने ही भाषा घडवायची आहे. या सद्हेतूने प्रेरित होऊन कै. ना. स. श्रीखंडे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने या अनुवादांचा सर्वांगीण विचार केला. समितीतील सर्व सदस्य हे आपल्या कायदा क्षेत्रात निष्णात तर होतेच, पण बहुतेक सदस्य नुसते व्यावसायिक कायदेपंडित नव्हते; तर संस्कृत-मराठी भाषेचे विद्वानही होते. त्यामुळे या कामाला शास्त्रशुद्ध स्वरूप प्राप्त झाले.

तथापि, या अनुवादांच्या भाषेवर केंद्रीय हिंदी भाषेची नसती दडपणे आली. भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३४४ (१) अनुसार १९५५ साली भारत सरकारने 'राजभाषा आयोग' स्थापन केला. सदर आयोगाने १९५७ साली दिलेला अहवाल संसदीय समितीने १९५९ साली संमत केला. त्यामध्ये आयोगाने केलेल्या परिभाषानिर्मितीविषयक शिफारशी संसदीय समितीने स्वीकारल्या. या बहुतेक शिफारशी निव्वळ आदर्शभूत अशाच होत्या. त्यांत आक्षेपार्ह असे काहीही नव्हते. तरीही प्रत्यक्षात अमलात आलेले केंद्र सरकारचे धोरण टीकाविषय का झाले, हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. याचे साधेसोपे उत्तर असे, की केंद्र सरकारच्या समित्यांनी वा भाषा अधिकाऱ्यांनी उपर्युक्त शिफारशींचा अर्थ नीट ध्यानात न घेता, तर कधी त्यांतील नेमका भाग दुर्लक्षित करून, तर कधी त्यांतल्या भलत्याच अंगावर अतिरेकी भर देऊन दांडगाईने हे धोरण अमलात आणण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नात त्यांनी हिंदी भाषेचे तर नुकसान केलेच, पण इतर प्रादेशिक भाषांवरही विशेषतः मराठी भाषेवर भाषिक अत्याचार केले.

(दोन उदाहरणे matrimonial law विवाह विधी wedding rites, Property tax = संपत्तिकर = wealth tax)

(विस्तारभयास्तव उदाहरणे देण्याचे टाळले आहे.)

केंद्रीय योजनेनुसार, भाषा संचालनालयात केलेल्या केंद्रीय कायदे- अनुवादांचा अनुवाद-खर्च व छपाई-खर्च केंद्र सरकार देते. म्हणून भाषा संचालनालयाने तयार केलेल्या अनुवादांना केंद्रीय विधी-न्याय मंत्रालयातील 'राजभाषा खंड' या कार्यालयाची मान्यता घ्यावी लागते. भाषा संचालनालयातील अधिकाऱ्यांना दिल्लीला चर्चेसाठी जावे लागते, तेव्हा तेथील अधिकाऱ्यांना मराठी भाषेचे ज्ञान नसल्याने तेथे फक्त शब्दसूच्यांवर चर्चा होते व त्या ओघात हिंदी भाषेने मान्य केलेले बोजड शब्द मराठीने स्वीकारावेत, असा त्यांचा नुसताच आग्रह नव्हे, तर कधी कधी त्यांचे अक्षरशः दडपण येते. म्हणतात ना 'अर्थस्य पुरुषो दासः'. वास्तविक, केवळ केंद्र सरकारने खर्च दिला, म्हणून मराठी भाषेनेही दडपणे मानावीत, असा कुठेही नियम नाही. पण प्रत्यक्षात या दडपणांना मान तुकवली गेली, ही वस्तुस्थिती आहे. मराठी अनुवादातील सर्व कठीण शब्दांची गंगोत्री दिल्लीत आहे. अलीकडे ही परिस्थिती काहीशी बदललेली असली, तरी

झालेली हानी भरून निघणार नाही. उलट, पूर्वीचे अनुवाद व अलिकडचे अनुवाद यांत परिभाषेच्या दृष्टीनेही तफावत निर्माण होईल. पूर्वीचे छापलेले अनुवाद पुन्हा बदलणे ही फार कठीण गोष्ट आहे. अलीकडेच मराठी संविधानाच्या अनुवादावर भाषा कठीण असल्याचा आक्षेप आल्याने विद्यमान विधिसमितीत त्याचा फेरविचार चालू झाल्याचे कळते.

हिंदी व इतर प्रादेशिक भाषांमधील कायदेविषयक भाषांतरांच्या संबंधात दि. ८ मार्च, १९७० रोजी तत्कालीन केंद्रीय कायदेमंत्री श्री. पी. गोविंद मेनन यांनी 'टाइम्स ऑफ इंडिया' या दैनिकात एक अत्यंत महत्त्वपूर्ण व मननीय लेख लिहिला होता. (Law and Hindi) त्यामध्ये सरकारी भाषा-धोरणासंबंधी त्यांनी आत्मपरीक्षण करून अत्यंत मूलगामी विचार मांडले होते. तथापि, केंद्रीय विधी-न्याय मंत्रालयातील कोणाही अधिकाऱ्यांवर त्याचा प्रभाव पडला नाही व ही दुर्दैवाची बाब होय; आणि त्यांच्या पश्चातही हिंदीच्या व इतर भाषांच्या दुर्दैवाचे दशावतार तसेच चालू राहिले.

याच वेळी महाराष्ट्र राज्याच्या विधिमंडळाने करावयाच्या कायद्यांच्या अनुवादांचा एक स्वतंत्र प्रवाह वाहत होता. 'महाराष्ट्र राजभाषा अधिनियम' चे कलम ५ या वर्षीपर्यंत अमलात आले नसल्याने, आतापर्यंत राज्य कायद्यांच्या मूळ इंग्रजी मसुद्याबरोबर मराठी व हिंदी अनुवाद प्रसिद्ध केले जात. हे काम विधी-न्याय विभागाकडून भाषा संचालनालयाकडे बदली झालेल्या विधी अनुवाद-शाखेकडून केले जाते. राजभाषा अधिनियमाचे कलम ५ लगेच अमलात आले नाही, तरी त्या कायद्यात अशी तरतूद केली होती, की विधिमंडळापुढे विधेयकाचा इंग्रजी मसुदा मांडताना सोबत त्याचा मराठी व हिंदी अनुवाद मांडला गेला पाहिजे. त्यामुळे एका परीने मराठीचा फायदाही झाला व एका परीने तोटाही झाला. फायदा असा, की कोणत्याही राज्य कायद्याचे मराठी भाषांतर मागे पडले नाही, प्रत्येक कायद्याच्या इंग्रजी मसुद्याच्या जोडीने मराठी अनुवाद उपलब्ध होत गेला. पण वेगळया अर्थाने तोटा झाला. एक तर भाषा संचालनालयात या शाखेला कोणाही कायदेतज्ज्ञ व्यक्तीचे मार्गदर्शन मिळाले नाही; कधी अडचणी आल्या, तर विधी-न्याय विभागाकडून म्हणावी तशी मदत झाली नाही. उलट, सरकार पक्षाला इंग्रजी विधेयक मांडण्याची घाई असल्याने व राजभाषा कायद्यातील नियमाची पूर्तता करण्यासाठी केवळ उपचार म्हणून मराठी भाषांतर जोडण्याची खटपट चालत असल्याने, भाषांतर लवकरात लवकर पूर्ण करण्याची निकड लावली जाते. त्यामुळे भाषांतर कसेबसे पुरे करून देण्यापलीकडे भाषा संचालनालयाला गत्यंतर उरत नाही, त्यात आवश्यक सफाई आणता येत नाही व अर्थदृष्ट्या त्यात काही त्रुटी राहून जाण्याची शक्यता वाढते. वारंवार मागणी करूनही विधी व न्याय विभागाने या कामावरील देखरेखीसाठी कोणीही तज्ज्ञ अधिकारी उपलब्ध करून दिला नाही. उलट, मराठीशी आमचा सुतराम् संबंध नाही, असे म्हणून सातत्याने विश्वामित्री पवित्रा घेतला.

खरे पाहता, राजभाषा अधिनियमाच्या कलम ५ अनुसार 'नेमलेल्या दिवसा',

पासून कायद्याची भाषा मराठी म्हणून जाहीर करणे ही सामान्य प्रशासन विभागाची जबाबदारी होती. त्या विभागाने विधी-न्याय विभागाची वारंवार मनधरणी करून याविषयीची अधिसूचना काढण्यासाठी संमती मागितली. पण विधी-न्याय विभागाने गेली तीस वर्षे संमती दिली नाही. यामागील मेख एवढीच होती, की हे कलम अमलात आले, तर मराठी मसुदा सादर करणे ही सर्वस्वी विधी व न्यांय विभागाची जबाबदारी ठरेल, प्रत्येक मसुदा एक तर मुळात मराठीतून करावा लागेल किंवा भाषा संचालनालयाने अनुवाद-रूपाने तो तयार केला, तरी तो काळजीपूर्वक तपासावा लागेल, त्याच्या बिनचूकपणाचे दायित्व पत्करावे लागेल व त्याखाली विधी सचिवांना स्वाक्षरी करावी लागेल. याप्रमाणे गेल्या तीस वर्षांत विधी-न्याय विभागाने मराठीकडे संपूर्ण दुर्लक्ष केले, कसलीही पूर्वतयारी केली नाही. वास्तविक विधिमंडळाने जनतेला दिलेले हे आश्वासन होते. एखादा कायदा करून तो योग्य सबबीशिवाय वर्षानुवर्ष अमलात न आणणे किंवा एखादा कायदा कधीच अमलात न आणण्याच्या इराद्याने तो संमत करणे ही कायद्याची घोर फसवणूक होय, असे एका न्यायाधीशांनी आपल्या निकालपत्रात म्हटल्याचे मला स्मरते. परंतु उशिरा का होईना, सत्तांतर झाल्यावर तरी शासनाला जाग आली. सत्तेचा दट्ट्या आल्याबरोबर मराठीचा भाग्यसूर्य उगवला, ही अभिनंदनीय गोष्ट होय.

**कलम ५ ची अंमलबजावणी :** अमलात आलेल्या अधिसूचनेचा गर्भितार्थ : यापुढे मराठी ही राज्य कायद्यांची अधिकृत मूळ भाषा राहणार आहे. (authoritative text); इंग्रजी व हिंदी या अनुवाद-भाषा राहणार (authorised translations) त्यांना authoritative text म्हणता येणार नाही. प्रत्यक्षात ही प्रक्रिया उलट असली, तरी मराठी पाठाला 'प्रमाण दर्जा' राहणार आहे.

समारोपादाखल एक त्रुटी नजरेस आणून देता येईल-एकाच यंत्रणेमार्फत केले जाणारे केंद्रीय कायद्यांचे अनुवाद व राज्य कायद्याचे अनुवाद यांच्यामध्ये अद्याप भाषिक समन्वय करता आलेला नाही. त्या दृष्टीनेही प्रयत्न होणे जरुरीचे आहे.

**माजी भाषा उपसंचालक, भाषा संचालनाय, महाराष्ट्र शासन**
**१६, यशोदा कुंज. सी.टी.एस्., ३३२, तेजस सोसायटीजवळ, कोथरूड,**
**पुणे ४११०२९. दूरध्वनी - ३४९७५५.**

❑





अनुक्रमणिका

# आपणही भाषांतर करू शकतो

**मूळ लेखक : सुधाकर मराठे**

**अनुवादक : ऊर्मिला भिर्डीकर**

स्वातंत्र्यपूर्व भारतात भाषांतर हा इंग्रजी भाषेच्या अध्यापन आणि परीक्षा–पद्धतीचा एक अविभाज्य घटक होता. नंतरच्या काळात भाषांतर जवळपास बादच ठरले. परिणामतः आज ELT पद्धत्यनुसार किंवा अन्य पद्धत्यनुसार इंग्रजीचे अध्यापन करणाऱ्यांपैकी कोणीच भाषांतरे करत नाहीत – अर्थात आनंदासाठी किंवा अन्य काम म्हणून भाषांतरे करणाऱ्या काही अध्यापकांचा अपवाद वगळता.

येथे अर्थातच मला 'भाषांतर–पद्धती' च्या उपयुक्ततेची चर्चा करायची नसून-काही विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात अध्यापन व अध्ययनाचे महत्त्वाचे साधन म्हणून भाषांतराचा उपयोग होऊ शकतो, हा मुद्दा मांडण्याचा माझा उद्देश आहे.

बहुतेक शाळा व महाविद्यालयामधील अध्यापकांना मोठ्या (संख्येने) वर्गांना शिकवावे लागते. या परिस्थितीत *विद्यार्थ्यांच्या मातृभाषेतून* अध्यापन करावे, अशी मागणी विद्यार्थी व शिक्षणसंस्थांकडून पुढे येऊ शकते. मला असे वाटते, की याला विरोध करण्याऐवजी, अधिक प्रभावी अध्यापनासाठी अध्यापकांनी भाषांतराचा सरसहा, पण *व्यवस्थितपणे* उपयोग करावा. एक मुद्दा असा आहे, की 'मातृभाषेतून' अध्यापन केल्यास 'पाठ्यार्थ' जरी अधिक चांगल्या रीतीने समजत असला, तरी *भाषेचे* अध्ययन आणि सराव यांच्याकडे दुर्लक्ष होते. ही घटना तशी सार्वत्रिक आहे; आणि अशा परिस्थितीमध्ये भाषा (म्हणजे भाषिक कौशल्ये) शिकवण्याबाबत इतक्या अडचणी अध्यापकांनी मांडल्या आहेत व त्यात विद्यार्थ्यांचे जे नुकसान अध्याहृत आहे, त्यासंबंधी अधिक विस्ताराने काही लिहिण्याची गरज नाही.

त्याऐवजी गेल्या दोनेक वर्षांत यूजीसी रिफ्रेशर कोर्समधून मी जो पद्धतशीर प्रयत्न करत आलो आहे, तोच येथे थोडक्यात मांडता येईल. प्रथम वर उल्लेखिलेली परिस्थिती मी पुनः एकदा पुढे मांडतो. अर्थातच ही सत्य परिस्थिती असल्याचे सर्वजण मान्य करतात. यानंतर मी विचारतो, की आपण या परिस्थितीला शरण जायचे, की अधिक प्रभावी अध्यापनासाठी प्रयत्न करायचे? अर्थातच असे प्रयत्न करण्याविषयी सर्वांचे एकमत होते. यानंतर मी त्यांना एक कविता वाचायला देतो (प्रयोगासाठी लहानशी संहिता घेणे सोयिस्कर असते, म्हणून) व त्यांना शक्य असेल, तसे त्या कवितेचे त्यांच्या विद्यार्थ्यांच्या मातृभाषेत

भाषांतर करण्यास सांगतो. काही वेळा थोडी कुजबुज; काही शंका पुढे येतात आणि काही अध्यापकांच्याकडून 'आपण तर अशी भाषांतरं नेहमीच करत आलेलो आहोत' असा आत्मविश्वासपूर्वक दावाही केला जातो.

पण भाषांतराला सुरुवात केल्या केल्याच सर्वांच्याच लक्षात येते, की ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. मदतीची गरज आहे, किंबहुना 'भाषांतराची' व्याख्या करणे गरजेचे आहे. आणखी असेही लक्षात येते, की आपल्याला वाटते, तितकी स्वतःची भाषा आपल्याला चांगली माहीत नाही, पण सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, भाषांतर करणे ही कृतीच अत्यंत आनंददायक व मार्गदर्शक आहे.

एखादा पाठ वर्गात शिकवण्याची पूर्वतयारी म्हणून त्या पाठाचे भाषांतर करण्याचे काय फायदे आहेत, हे सांगण्याआधी मी नेहमी उदाहरणादाखल घेत असलेली कविताच पुढे देत आहे. शाळा व महाविद्यालयामध्ये भाषा शिकविण्यासाठी ही कविता मुद्दाम वापरावी, असे मला वाटते.

## It's your own fault

Of course you can play with them.
There's no harm in them.
They are only words.
Words alone are certain good, said someone.
And someone also said:
Unlike sticks and stones
Words will never break your bones.

(That is called a rhyme. A rhyme
Is nice to play with too from time to time.)

What? They have turned nasty?
They've clawed you and bitten you/
Dear me, there's blood all over the place,
And broken bones.

They were perfectly tame when I left them.
Something they ate must have disagreed with them.
You mean you fed them on meaning?
No wonder then.

---

डी. जे. एनूराईट – माझे सहकारी के. नारायण चंद्रन् यांनी ही कविता प्रथम माझ्या नजरेस आणली.





अनुक्रमणिका

माझ्या योजनेचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणून मी अध्यापकांना ही कविता प्रथम स्वतःशीच – मनातल्या मनात – वाचायला सांगतो. यानंतर मी एकसुरी आवाजात ती मोठ्याने वाचतो. त्यानंतर शब्दाघात आणि स्वराघात यांची माझ्या मते जी सर्वमान्य व आवश्यक रचना आहे, ती स्पष्ट होईल, अशा रीतीने ही कविता पुनः एकदा मोठ्याने वाचतो. यामधून कविता/संहितेचा बराचसा 'उलगडा' झालेला असतोच. म्हणजेच छापील संहिता आणि कविता (जी स्वतःशीच मनात–वाचताना देखील कानांना *ऐकू* येते.) या दोन भिन्न गोष्टी आहेत हे मुद्दाम सांगण्याची आता गरज नसते.

या पुढील टप्प्यात आम्ही काही वेळा भाषांतरेही मोठ्याने वाचून पाहतो. पण सामान्यतः मी यानंतर अध्यापकांना दोन प्रश्नावल्या देतो. भाषांतरात व्यक्त न झालेल्या अनेक मुद्द्यांचा या प्रश्नांमधून उलगडा व्हावा, अशी अपेक्षा आहे. याचाच अर्थ असा, की कवितेत अनेक नव्या गोष्टींचा शोध लागतो आणि सामान्यतः अध्यापक शिकवण्यासाठी जी 'पूर्वतयारी' करतात, त्याव्यतिरिक्त कित्येक इतर मुद्दे कवितेमधून 'शिकवण्यासारखे' असतात, हे लक्षात येते.

**प्रश्नावली – १**

(खालील प्रश्नांची उत्तरे लिहा व आतापर्यंत लक्षात न आलेल्या व शिकवण्यासाठी योग्य अशा मुद्द्यांची मुद्दाम नोंद करा.)

१) कवितेत 'कथानक' आहे का? ते केव्हा लक्षात येते – प्रथम वाचनातून? नंतर?

२) (कथानक असल्यास) कवितेत काय *घडते*? कोण कोण पात्रे आहेत? हे तुम्हांला कसे समजले? काही 'अनपेक्षित' पात्रे आहेत का? कोणती?

३) मुद्दाम ठसवलेले मुद्दे कोणते आहेत? इतर काही मुद्दे पुढे येतात का? का?

४) या कवितेत 'नाट्य' आहे काय? ते कसे व्यक्त झाले आहे?

५) या कवितेचे 'भाग' पाडता येतील का? ते कशा प्रकारे दर्शविले आहेत?

६) या कवितेतील निरनिराळे 'आवाज' म्हणून दाखवा. यासाठी काय पूर्वतयारी करावी लागेल, असे म्हणणे जमते आहे का? नसल्यास तुम्ही काय कराल?

७) या आवाजामध्ये भावनिदर्शक स्वरभेद आहेत का? ते कसे समजले? ते कशा रीतीने म्हटले पाहिजेत? आणखी काही भावनिदर्शक स्वरभेद दाखवता येतील का? त्यांचा कवितेच्या अर्थावर किंवा पात्रांमधील परस्परसंबंधांवर काय परिणाम होतो?

८) कवितेतील सर्व आवाज कोठे कोठे दिसतात, हे स्पष्ट करा. यांपैकी काही आवाज ‘ऐकू’ येत नसतील, तर त्यासाठी विवक्षित नाट्य–संहिता लिहा. (ही संहिता तुमच्या (१) व (२) उत्तराशी जुळते आहे, याची खात्री करा)

९) कवितेतील ‘वाक्प्रचार’ ओळखा. त्यांच्या वापराची इतर उदाहरणे सिद्ध करा.

१०) कवितेत वापरलेले ठोकळेबाज/जुनाट शब्दप्रयोग दर्शवा. हे शब्दप्रयोग कवितेत कशा रीतीने / कोणत्या कारणासाठी वापरले आहेत?

११) या कवितेत व्याकरणदृष्ट्या उल्लेखनीय मुद्दे कोणते आहेत?

१२) एकमेकांशी विसंगत व विजातीय शब्द/शब्दसमूहांची यादी करा.

१३) कवितेचा ‘भावार्थ’, ‘तार्किक चर्चे’ च्या स्वरूपात लिहा. ‘कथा’ व ‘तार्किक चर्चा’ यांमध्ये काय भेद आहे?

१४) कवितेचा ‘अर्थ’ सिद्ध करण्यासाठी आणखी काही मुद्दे / नवीन अर्थ / टिप्पणी, इ. मांडता येतील काय?

**प्रश्नावली २ (संपूर्ण कवितेविषयी)**

१) ही कविता आहे, म्हणजेच ‘अर्था’ च्या ताकदीविषयी आहे, असे समजल्यास त्यात ‘अर्थनिर्णयना’च्या सर्व शक्यतांचा विचार केला आहे काय?

२) ही कविता शब्दांविषयी आहे – मानवी भाषेविषयी आहे.

३) नाट्यमय कविता आहे, असे समजल्यास – यातील नाचयमयता केवळ शारीरिक हिंसेशी निगडित आहे काय?

४) ही कविता मनोवृत्तीविषयी आहे.

५) ही कविता ‘दुखावले’ गेलेल्यांविषयी आहे.

६) ही कविता ‘दुखावल्या’ बद्दल काहीच न वाटून घेणाऱ्यांविषयी आहे.

७) या कवितेत ‘दुखवणारे’ व ‘दुखावले जाणारे’ यांच्या सामाजिक प्रवृत्तीचे नाट्यमय किंवा प्रतीकात्मक दर्शन घडते – या कवितेत सत्तामदाचे रूपक वापरले आहे.

८) ही कविता शाब्दिक खेळांविषयी आहे.

९) ही कविता मानवी-भाषिक देवाणघेवाणीतील पाशवीपणाविषयी आहे.

१०) ‘दुखावण्याची ताकद/सत्ता’ उजेडात आणण्यासाठी ‘सामान्यांच्या’ अनुभवाचे संरचन करणारी कविता.

११) दुःखी लोकांना त्यांचे दोष दाखवून देण्यासाठी एक औपरोधिक व उरफाटे तर्कशास्त्र दर्शविणारी कविता?

१२) अशा प्रकारच्या अनुभवांची रचना दर्शविणाऱ्या इतर कोणत्या संरचना पाहता येतील? (उदा., स्त्रियांशी बोलताना पुरुष कोणत्या शब्दरचना वापरतात? – प्रौढ लहानांशी बोलताना? वरिष्ठ कनिष्ठांशी बोलताना?)

वरील दोन्ही प्रश्नावल्यांमधून तुमच्या लक्षात आलेल्या सर्व मुद्द्यांचा वापर करून एक शक्य तितके सुसंगत व्याख्यान लिहून काढा. तुम्ही केलेले भाषांतर वरील प्रश्नांच्या संदर्भात पडताळून पाहा.

तुम्ही नेहमी करत असलेली पूर्वतयारी व या पद्धतीतून तयार झालेली पूर्वतयारी यांची तुलना करा.

वरील सर्व प्रश्नोतरे पूर्ण झाल्यानंतर ‘पूर्वतयारी म्हणून करायच्या भाषांतराचे’ पुढील फायदे स्पष्ट होतात :

★ आपली मातृभाषा आपल्याला किती चांगली / ठीक / परिणामकारकरीत्या वापरता येते, हे अध्यापकांच्या लक्षात येते.

★ अध्यापनासंबंधीचे – आधी कधीच लक्षात न आलेले–अनेक मुद्दे पुढे येतात.

★ कविता आणि कवितेतील भाषा शिकताना विद्यार्थ्यांना काय अडचणी येतील, हे अध्यापकांना अधिक स्पष्टपणे जाणवते (कारण मातृभाषेतून हे सर्व व्यक्त करीत असताना नेमके असे मुद्दे पुढे येतात).

★ शिकवण्यासाठी नेहमी केल्या जाणाऱ्या पूर्वतयारीपेक्षा ही पूर्वतयारी अधिक व्यवस्थित आहे.

★ विद्यार्थ्यांना कविता चांगली समजावी, म्हणून अनेक नव्या / निरनिराळ्या साधनांचा (उदा., शब्दकोश, उदाहरणे) कसा वापर करावा, हे अध्यापकांना समजते.

★ वर्गात शिकवण्यासाठी व विद्यार्थ्यांच्या मातृभाषेविषयी अध्यापकांची स्वतःची पूर्वतयारी अधिक ठोस, अस्खलित आणि परिणामकारक होते.

★ संहितेतील भाषिक उपकरणाचे वैशिष्ट्य अधिक स्पष्टपणे लक्षात येते.

★ यामुळे वर्गाचे ‘इंग्रजी’ देखील अधिक आत्मविश्वासाने व अस्खलितपणे नियंत्रित करता येते.

★ सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे, अध्यापकांना भाषांतराचा आनंद मिळतो व त्याचा वर्गाबाहेरील जीवनातही काही उपयोग करण्याची शक्यता निर्माण होते.

आता अध्यापकांच्या दृष्टीने एक महत्त्वाचा प्रश्न असा असतो, की प्रत्येक पाठासाठी एवढी पूर्वतयारी करायला वेळ कसा मिळणार? खरे तर, वेळ पुष्कळ असतो. विशेषतः सर्व लहान पाठांसाठी एवढी संपूर्ण तयारी करायची ठरवली, तर सहज जमण्यासारखे आहे.

पण सर्वच पाठांसाठी एवढी पूर्वतयारी करण्याइतका वेळ खरेच नसेल, तर काही महत्त्वाच्या पाठांची अशी तयारी केल्यास त्याचा इतर पाठांवरही परिणाम होतोच.

पण 'इंग्रजीच्या सरावाचे' काय, हा प्रश्न अजूनही विचारला जाऊ शकतो? त्याचे उत्तर म्हणून मी विचारतो, की आताच्या तुमच्या शिकवण्यात त्याचे काय होत असते? पण याचे अधिक उपयुक्त उत्तर देता येते. म्हणजे असे, की संपूर्णपणे मातृभाषेतूनच शिकवण्याऐवजी तासाचा दोन तृतीयांश वेळ मातृभाषेतून परिणामकारकरीत्या शिकवण्यासाठी घालवावा व उरलेला वेळ तोच भाग पुनः इंग्रजीमधून व तडजोड न करता अस्खलित इंग्रजीमधूनच शिकवावा. यामुळे विद्यार्थ्यांना पाठाशी संबंधित असलेल्या इंग्रजीच्या सरावाची संधी मिळेल.

ही पद्धत स्वतः वापरून पाहिली असल्यामुळे व अनेक महाविद्यालयीन अध्यापकांबरोबर ती पुनः पुनः वापरून पाहिली असल्यामुळे – मातृभाषेतून शिकविण्यातील अडचणींवर मात करण्यासाठी ही पद्धत योग्य आहे, असे मला खात्रीपूर्वक वाटते. त्याचप्रमाणे स्वतःच्या मातृभाषेविषयी अधिक आवड निर्माण होऊन अध्यापनाच्या आताच्या मर्यादापलीकडे जाता येईल, असेही वाटते.

इंग्रजी विभाग, हैदराबाद विद्यापीठ, हैदराबाद - ५०० ०४६.

●●●





अनुक्रमणिका

# ज्ञानेश्वरांचे पसायदान : एक शैलीवैज्ञानिक अभ्यास

– चं. द. इंदापूरकर

अठरावा अध्याय हा ज्ञानेश्वरीचा कळसाध्याय. पसायदान हा या अध्यायाचा शिखरबिंदू. तो आकाराने अगदी लहान, पण भावार्थाने आणि काव्यात्मकतेने तितकाच महान. ज्ञानेश्वरांचं व्यक्तित्व आणि कवित्व पसायदानातून फुलून आलं आहे. या पसायदानाचाच रसास्वाद आपणांला येथे घ्यावयाचा आहे. शैली-वैज्ञानिक दृष्टिकोनातून विवेचनासाठी मंगरूळकर-केळकर संपादित 'ज्ञानदेवी' (१९९४, मुंबई विद्यापीठ) ही प्रत प्रामुख्याने लक्षात घेतली आहे. पसायदान हे भावार्थाने विश्वगीत असल्याने त्याचा उल्लेख पुढील विवेचनात अनेकदा 'गीत' या त्रोटक शब्दाने केला आहे.

**पसायदानाची संरचना**

'पसायदाना' मध्ये फक्त नऊ ओव्या आहेत. यांची संरचना अशी दाखविता येईल.

(सुटे आकडे पसायदानातील ओवीचा क्रमांक दाखवितात.)

(अ) १

(ब$_१$) २, ३

(ब$_२$) ४, ५, ६

(ब$_३$) ७, ८

(क) ९

हीच संरचना आकृतिबंधात अशी रेखांकित करता येईल. (येथेही आकडे पसायदानातील ओवीचा क्रमांक दाखवितात.)




या आकृतिबंधामुळे या गीताच्या संरचनेचा रसास्वाद सुलभरीत्या घेता येऊ शकतो.





अनुक्रमणिका

या संरचनेतील सर्वांत प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे, अत्यंत प्रभावी समतोल. गीताच्या पहिल्याच ओवीत ज्ञानेश्वर विश्वात्मक देवाला पसायदान मागतात, तर शेवटच्या नवव्या ओवीत हा विश्वेश्वरराव ते पसायदान देऊन ज्ञानेश्वरांस सुखी करतात. मधल्या सात ओव्यांत ज्ञानेश्वरांनी मागितलेले पसायदान आले आहे. म्हणून वर दाखविलेल्या तक्त्यात या ओव्यांची विभागणी 'अ', 'ब' व 'क' अशा विभागांत दाखवली आहे. 'ब' विभागातील ओव्यांची विभागणीही समतोल राखून केलेली आहे. '$ब_{१}$' मध्ये '$ब_{३}$' मध्ये प्रत्येकी दोन ओव्या आहेत, तर मध्यभागी गाभ्याच्या ठिकाणी असलेल्या 'ब२' मध्ये काव्यात्मकतेचा मनोहर आविष्कार असलेल्या तीन ओव्या आल्या आहेत.

अर्थदृष्ट्याही ह्या सात ओव्यांत मोठा रसपूर्ण समतोल राखला गेला आहे. ज्ञानेश्वरांनी मागितलेले पसायदान हे स्वतःच्या लाभासाठी नसून, सर्वस्वी समाजोद्धारासाठी आहे. समाजातील प्रत्येक व्यक्तीला शाश्वत सुखाचा ठेवा मिळावा, यासाठी ज्ञानेश्वरांची धडपड आहे. म्हणून या गीतात ज्ञानेश्वर प्रथमतःच खळांतील कुटिलपणा दूर व्हावा व त्यांना सत्संगतीत गोडी लागावी, असा प्रसाद मागतात. ($ब_{१}$ : २, ३) विश्वातील प्रत्येक प्राणिमात्राच्या मनातील पापाचा अंधकार नाहीसा व्हावा व त्याच्या स्वधर्मरूप सूर्याचा प्रकाश सर्वत्र पडावा, असे त्यांचे मागणे आहे. थोडक्यात, जन्मजात दुष्टांसह समाजातील सर्व व्यक्तींच्या मनांतील कुवासना नष्ट व्हाव्यात व आपल्या कर्तव्याची जाणीव ठेवून त्यांचा आचार सुसंपन्न व्हावा, अशी ज्ञानेश्वरांची अपेक्षा आहे. खळांसह प्रत्येक व्यक्तीत असे परिवर्तन झाले, की ज्ञानेश्वर निःसंकोचपणे म्हणतात, 'प्रत्येक व्यक्तीच्या मनात जी जी इच्छा येईल, ती ती पूर्ण व्हावी' याचे कारण एकच आहे - अशा व्यक्तीच्या मनात आता फक्त सदिच्छाच निर्माण होणार. तो जे काही मागणार, ते स्वार्थासाठी नसून, फक्त परार्थासाठीच असणार.

आणि प्रत्येक व्यक्तीचे असे परिवर्तन झाल्यावर काय निर्माण होणार? तर सर्व मांगल्याचा वर्षाव करणाऱ्या ईश्वरनिष्ठ सज्जनांचे मेळावे. '$ब_{२}$' मधल्या गाभ्याच्या ३ ओव्यांत (ओव्या ४, ५, ६) या सज्जनांचेच रमणीय वर्णन आहे. हे सज्जन म्हणजेच चालत्यावोलत्या कल्पतरूंचे बगीचे, चैतन्यदायक चिंतामणींचे गाव, व अमृताचे चालतेबोलते सागर, लांछन नसलेले चंद्रमे व तापरहित सूर्य असे हे सज्जन सर्वांचे सदा सर्वकाळ नातलग होवोत.

खळासहित प्रत्येक व्यक्तीचा खराखुरा उद्धार व्हावयाचा असेल, तर त्याला संतांचा प्रेमळ सहवास सदोदित मिळणे आवश्यक आहे. मगच त्याच्या संपूर्ण सुखप्राप्तीचा मार्ग निर्वेध होणार. म्हणूनच ज्ञानेश्वरांनी मोठ्या रमणीय भाषेत या संतांची थोरवी वर्णन केली आहे - या तीन ओव्यांत. या तीन ओव्या अशा प्रकारे अर्थदृष्ट्याही पुढील दोन ओव्यांच्या संचाचा($ब_{३}$ : ७, ८) आधारच आहे. या दोन ओव्यांत ज्ञानेश्वरांनी अशा प्रकारे संतकृपा झालेल्या व्यक्तीचे वर्णन केले आहे. ही

व्यक्ती सर्व प्रकारच्या शाश्वत सुखांनी परिपूर्ण होऊन आदिपुरुषाचे अखंड ध्यान करणार व ज्ञानेश्वरीची उपासना करीत ऐहिक आणि पारमार्थिक क्षेत्रात विजयी होणार. ही व्यक्ती एखाद-दुसरी निवडक व्यक्ती असणार नाही, तर विश्वातील प्रत्येक व्यक्ती असेल. (ब$_{१}$) मधील ओव्यांत वर्णन केलेले विश्वातील सर्व प्राणिमात्र संतसंगतीने (ब$_{२}$ मधील ओव्या) अशा प्रकारे पूर्ण सुखी व पूर्ण विजयी होणार. अशा रीतीने (ब$_{२}$) मधील ४, ५, ६ या ओव्या (ब$_{१}$) मधील २, ३ या ओव्या व (ब$_{३}$) मधील ७, ८ या ओव्या यांना अर्थदृष्ट्याही जोडणारा एक रमणीय हेतू ठरतो.

या गीताची संपूर्ण रचना ऊर्ध्वगामी असून, शेवटच्या ९ व्या ओवीत चरमसीमा गाठलेली आहे. ही चरमसीमा फक्त या गीताचीच नसून, संपूर्ण ज्ञानेश्वरीची आणि ज्ञानेश्वरांच्या संपूर्ण जीवनकार्याचीही आहे. 'हा होईल दानपसावो', असा प्रसार मूर्तिमंत विश्वेश्वररावो असलेले सद्‌गुरू निवृत्तिनाथ येथे आनंदाने देतात; आणि त्या प्रसादाने श्री ज्ञानेश्वरांनाही अननुभूत आनंद प्राप्त होतो; कारण यातच त्यांच्या काव्याची आणि जीवनाची उद्दिष्टप्राप्ती साठविलेली आहे.

थोडक्यात, वरील आकृतीत दाखविल्याप्रमाणे संरचना आणि अर्थ या दोन्ही दृष्टींनी समतोल राखत या गीताची ऊर्ध्वगामी रचना नितांत रमणीय झाली आहे.

**शब्दार्थसौंदर्य : क्रियापद-विचार**

आता या गीतातील काही शब्दांच्या अर्थाची फोड करण्याचा प्रयत्न करू या. त्यामुळेही आपणांला ज्ञानेश्वरांच्या शब्दसृष्टीच्या सौंदर्याचा आस्वाद घ्यायला मदत मिळेल.

या गीताच्या पहिल्याच ओवीत ज्ञानेश्वर 'विश्वात्मक देवा' ची प्रार्थना करताना व त्याला पसायदान मागताना दिसतात. या पसायदानाची पूर्ती 'विश्वेश्वररावा' ने या गीताच्या शेवटी ९ व्या ओवीत केल्याचे दिसते. हा विश्वेश्वरराव म्हणजेच ज्ञानेश्वरांचे गुरू श्रीनिवृत्तिनाथ, हे आपण पाहिलेच आहे. तेव्हा विश्वात्मक देव व गुरू यांत ज्ञानदेव काहीच फरक करीत नाहीत, हे स्पष्ट आहे. गुरू म्हणजेच चराचर सृष्टीच्या पालनकर्त्याचे मूर्तस्वरूप, अशी त्यांची धारणा आहे. ज्ञानेश्वरीत अनेक ठिकाणी ज्ञानेश्वरांनी असे वर्णन केले आहे. उदा.,अ.१५.१-२६, अ. १८.१.२५. थोडक्यात, 'विश्वात्मक देव' हाच 'विश्वेसरू राऊ' आहे व तोच श्रीगुरू निवृत्तिनाथ आहे; म्हणूनच या दोन्ही शब्दांतील संगती स्पष्ट होते.

आता दुसऱ्या ओवीतील काही शब्दांचा विचार करू. विद्यापीठ प्रतीत 'वांकुडै मोडे' असा प्रयोग आला आहे; अन्य प्रतीत 'व्यंकटी सांडो' असा प्रयोग आढळतो. या गीताची एकंदर भाषा पाहिली तर तो संस्कृतप्रचुर आहे. तत्सम व तद्‌भव शब्दांचाच येथे प्रादुर्भाव आढळतो. तेव्हा माझ्या मते 'व्यंकटी सांडो' या प्रयोग जास्त उचित आहे, आता 'सांडो', 'वाढो' व (परस्परे) 'पडो' (मैत्र जीवाचें) या क्रियापदांचा विचार केला, तर आपणांस शब्दसौंदर्याचे एक सुंदर दालन उघडले गेल्याचा आनंद मिळतो. या

गतिवाचक शब्दांनी निर्देशित होणाऱ्या दिशा भिन्न भिन्न व सार्थ आहेत. रेखाकृतीत त्या अशा दाखवता येतील :

(व्यंकटी) सांडो ↓ (खाली फेकून देणे)

(सत्कर्मी किंवा सत्संगी रति) वाढो ↑ (वाढत जाणे)

(जीवाचे मैत्र परस्परे) पडो ⇆ (एकमेकांकडे प्रेमाची वाटचाल)

माणसाने आपला कुटीलपणा फेकून दिला पाहिजे, सत्कर्मावरील प्रेम वाढविले पाहिजे. परस्परांवर जिवाभावाने प्रेम केले पाहिजे - असा जो प्रसाद ज्ञानेश्वर मागतात त्यातली गोडी या समर्पक गतिदर्शक क्रियापदांमुळेही आलेली आहे, हे आपल्या लक्षात येईल.

तिसऱ्या ओवतही तीन गतिदर्शकक्रियापदे आली आहेत. त्यांच्या दिशाही अशाच भिन्न भिन्न आहेत. पुढील रेखाकृतीवरून हे लक्षात येईल :

(तिमिर) जावो ⟶ (बाहेर टाकणे)

(स्वधर्मोसूर्यो) पाहो ⟳ (चारही बाजूंस पाहणे)

(वांछिल ते ते) लाहो ⟵ (बाहेरून आत घेणे)

याला जोडूनच चौथ्या ओवतील 'भेटोतु' हे क्रियापद घेता येईल ते '(मैत्र) पडो' या जातीचे आहे कारण ईश्वरनिष्ठांच्या मेळाव्यांच्या भेटण्याची क्रिया परस्पपूरक आहे मात्र '(मैत्र) पडो' पेक्षाही अधिकनिकटचा भाव येथे दिसून येतो म्हणूनच रेखाकृतीत ते असे दाखविता येईल :

(भूतां) भेटतु ⟷

सहाव्या ओवीतील '(सोयरे) होंतु' हे क्रियापदही परस्परांतील सोहार्द दिग्दर्शित करते, म्हणून ते 'भेटतु' च्याच जातीतील आहे याची रेखाकृतीही अशी होईल :

(सोयरे) होंतु ⟷

तेव्हा या गतिवाचक क्रियापदांनी काही गोष्टी टाकून द्यावयाच्या, काही गोष्टी आत्मसात करायच्या तर काही गोष्टी परस्रांना द्यावयाच्या, असे दृष्टोत्पत्तीस येते परंतु या गतीचा शेवट, अखेरीस आत्मसुखातच झाला पाहिजे. ते दर्शविण्यासाठी ज्ञानदेवांनी '(सर्वसुखी पूर्ण)' होऊनि', 'आदिपुरुषी 'भजिजो' व 'विजयी होआवे' या स्थिर क्रियावाचक शब्दांचा उपयोग केला आहे. अशा रीतीने गतिवाचक क्रियापदांकडून स्थिरवाचक क्रियापदांकडे येऊन प्राणीमात्राची आत्मसुखामध्ये लीन होण्याची क्रिया ज्ञानेश्वरासंनी मोठ्या कौशल्याने चित्रित केली आहे.

**शब्दार्थसौंदर्य : नामविचार**

या गीतातील क्रियापदांना जसा आकार आहे, तसाच काही नामांना आहे. परंतु ””नील मनात ठसणारा प्रमुख आकार एकच आहे - गोलाकार. पहिल्याच ओळीतील





अनुक्रमणिका

पहिल्या चरणातील 'विश्वात्मक' या नामसाधित विशेषणातील 'विश्व' शब्द दृष्टीसमोर एक विश्वव्यापी महान गोल उभा करतो. माणसाच्या जीवनाचं उद्दिष्ट कोणतं असेल, तर ते या गोलाशी एकरूप व्हायचं. त्यासाठीच विश्वातल्या प्रत्येक प्राणिमात्रानं आदिपुरुषाचे अखंड भजन करायचे नि संपूर्ण सुख प्राप्त करून घ्यायचे. ज्ञानेश्वरांना पाहिजे असलेला हा प्रसाद या गीताच्या सातव्या ओवीत व्यक्त करण्यात आलेला आहे आणि त्यात योजिलेले '(सर्व सुखांनी परिपूर्ण झालेले) त्रैलोक्य' व 'आदिपुरुष' हे शब्द गोलाकाराचीच आठवण करून देतात. 'विश्व', 'स्वधर्मसूर्य' (ओवी३), भूतल (ओवी४), चिंतामणी (ओवी५), चंद्रमा, मार्तंड (ओवी६) ही नामेही गोलाकाराचा साक्षात्कार करून देतात. शेवटच्या नवव्या ओवीत गुरूचा उल्लेख 'विश्वेसरू राऊ' असा करून ज्ञानेश्वरांनी विशाल वर्तुळाकार विश्वाची परत आठवण करून दिली आहे.

या विश्वाशी एकरूप होण्याच्या प्रक्रियेत अडथळा आणणाऱ्या दुष्टांचा उल्लेख 'खल' असा केला आहे. (ओवी२) त्या वेळी सत्प्रवृतींना कुटणारा अर्धवक्राकार खल व त्याचा वक्रपणा (वांकुडै) आपल्या डोळयांसमोर उभा राहतो.

या गोलाकार 'विश्वा' चा उपयोगही ज्ञानेश्वरांनी समतोल राखून केला आहे. सुरुवातीची रेखाकृती पाहिली, तर पायथ्याच्या ओवी (३) मध्ये (ब१) 'विश्व' हा शब्द आला आहे. तर शीर्षस्थानाच्या ओवी (७) मध्ये (ब ३) त्याच अर्थीचा 'त्रैलोक्य' हा शब्द आला आहे. विद्यापीठ प्रतीतील 'विश्वा' या रूपापेक्षा 'विश्व' हेच रूप मला जास्त समर्पक वाटते. यामुळे समतोल तर साधला जातोच, परंतु 'विश्व' किंवा 'त्रैलोक्य' हे शब्द तेथील प्राणिमात्रांचे द्योतक म्हणून उपयोजिलेले दिसतात. इंग्रजीतील synecdoche (अंशपूर्णलक्ष्यी) अलंकाराचे हे सुंदर उदाहरण आहे.

पाचव्या आणि सहाव्या ओव्यांतील नामपद-बंधांतून तर ज्ञानेश्वरांच्या अपूर्व प्रतिभाशक्तीचं मोठं रमणीय स्वरूप आपणांला पाहायला मिळतं. या गीताच्या संरचनेचा विचार करताना या ओव्यांचा उल्लेख आपण गाभ्याच्या ओव्या म्हणून केला होताच. यातील नामपद-बंधांकडे जरा बारकाईने पाहत त्यांचे विश्लेषण करायला लागले, म्हणजे नवनवीन सौंदर्याचा साक्षात्कार आपणांस येऊ लागतो. प्रथम पाचव्या ओवीचा विचार करू या. या ओवीत खालील नामपद-बंध आहेत :

१) चलां कल्पतरूचे आरव

२) चेतवाचिंतामणिचे गाव

३) पियूखांचे बोलते अर्णव

हे वर्णन सज्जनांचे आहे, संतांचे आहे. रूपकांची मालिका गुंफून हे वर्णन केले आहे. सहाव्या ओवीतही ही मालिका चालूच आहे; मात्र तेथे योजण्यात आलेल्या नामपद-बंधांत जरा वेगळी सौंदर्यझाक आहे. तिचा विचार आपण यानंतर करू.

या ओवीतील वरील तिन्ही नामपद-बंधांची रचना अशी आहे :

धातुसाधित विशेषण + '-चे' प्रत्ययान्त विशेषण + अचेतन नाम

प्रत्येक नामपद-बंधात एकच धातुसाधित विशेषण व एकच '-चे' प्रत्ययान्त विशेषण आहे. नामपद-बंधातील मुख्य घटक नाम मात्र प्रत्येक ठिकाणी अचेतन नाम आहे. त्यामुळे ' चलां ... आरव '(चालणारे ... बगीचे), 'चेतवाचिंतामणिचे गाव' (चेतवलेल्या (=चैतन्ययुक्त ) चिंतामणीचे गाव), व '... बोलते अर्णव' ( बोलणारे समुद्र) असे शब्दप्रयोग तयार झाले आहेत. चॉम्स्कीच्या व्याकरणाचा आधार घेतला, तर हे सारे अव्याकरणिक प्रयोग म्हणून मराठी भाषेतून हद्दपार करावे लागतील. परंतु 'बोली अरूपाचे रूप दावीन' अशी प्रतिज्ञा करणारे बंडखोर ज्ञानेश्वर व्याकरणाच्या अशा नियमांना सरळ धाब्यावर बसवतात व अचेतन नामांना सचेतन नामांचे रूप देऊन त्यांच्यांत अद्‌भुत चैतन्य निर्माण करतात. ज्ञानेश्वरांच्या मताने सज्ञन म्हणजेच कल्पवृक्षांचे चालते बोलते बगीचे, चेतवलेल्या (= चैतन्ययुक्त) चिंतामणींची गावं, किंवा अमृताचे चालते बोलते सागर. सज्ञनांचं, संतांचं इतकं सुंदर वर्णन अन्यत्र कुठं पाहायला मिळणार ? इंग्रजीतला Personification (व्यक्तीकरण) अलंकार येथे सहजरीत्या अभिव्यक्त झाला आहे.

येथल्या धातुसाधितांची एक विशेष खुमारी आहे. ज्ञानेश्वर एका अचेतन नामात चैतन्य ओतण्यासाठी एकाच धातुसाधिताचा उपयोग करतात. (उदा., चलां कल्पतरूचे आरव) परंतु लक्षणेने ते धातुसाधित अन्य दोन्ही अचेतन नामांना लागू पडते. म्हणजे 'चालणारे' हे धातुसाधित 'चिंतामणी' व 'अर्णव' या दोहोंनाही तसेच सार्थपणे लागू पडते. तसेच, 'चैतन्ययुक्त' फक्त चिंतामणीच नाहीत, तर कल्पवृक्ष आणि अर्णवही आहेत; तर 'बोलणारे' जसे अर्णव आहेत, तसेच कल्पवृक्ष आणि चिंतामणीही आहेत.

या नामपद-बंधांतील '-चे' प्रत्ययान्त विशेषणांचेही एक आगळे सौंदर्य आहे. 'कल्पतरूचे आरव' म्हटले, की कल्पवृक्षाच्या फुलांचा मधुर सुगंध सर्वत्र पसरला आहे असे वाटते. 'चेतवाचिंतामणी' म्हटले की चिंतामणीच्या गोड स्पर्शाने पुनीत व्हावे, असा विचार मनात येतो. 'पीयूखांचे अर्णव' समोर उभे राहिले, की आपली रसना त्यांचा गोड स्वाद घेण्यासाठी तत्काल सरसावल्याखेरीज राहात नाही. केवळ शब्दांच्या सामर्थ्यातून पाची ज्ञानेंद्रियांना झुलवीत ठेवण्याचे अपूर्व काव्यकौशल्य ज्ञानेश्वरांजवळ आहे. त्याचा पुरेपूर प्रत्यय ही ओवी वाचताना येतो.

अलंकाराच्या दृष्टिकोनातून पाहिले, की काव्यसौंदर्याचे आणखी एक दालन येथे सहज उघडले जाते. तीन मनोहर रूपकांची मालिका तर येथे आहेच, पण अर्थदृष्ट्या या रूपकांचा चढता क्रम दिसून ज्ञानेश्वरांना सज्ञनांची संख्यात्मक व गुणात्मक विशालता अपेक्षित आहे. त्या दृष्टीने कल्पवृक्षांच्या बागांकडून चिंतामणींच्या गावांकडे जावे आणि त्याहूनही अधिक विशालता प्राप्त करण्यासाठी अमृताच्या सागरांचा आस्वाद घ्यावा. हे अमृताचे सागर संतांच्या अथांग प्रेमळ हृदयाचे दर्शन करून देतात, तर त्यांचे बोल म्हणजे सज्ञनांच्या या प्रेमळ हृदयातून उचंबळून आलेले मधुर शब्द. या शब्दांतच पूर्ण डुंबून जावं नि संतांच्या हृदयसागरातच लीन व्हावं.

तीन रूपकांच्या या मालिकेत असा चढता क्रम असल्याने इंग्रजीतील climax (बर्धिष्णू) अलंकार येथे साकार झाला आहे. या रूपक अलंकारात आणखीही एक गंमत दिसते. येथे प्रत्येक वेळी उपमानात काही तरी (उणीव आहे व ती भरून काढण्यासाठी समुचित धातुसाधित विशेषणाची जोड दिली आहे. म्हणून कल्पतरूंच्या उद्यानांना प्रथम चालते बोलते केले आहे व मग त्यांना उपमेयाच्या म्हणजे सज्जनांच्या पंक्तीला आणले. परंतु मूलतः उपमेय हे उपमानापेक्षा श्रेष्ठ असल्याने येथे व्यतिरेक अलंकारही गर्भित आहे. माझ्या मते या अलंकारास व्यतिरेकी रूपक अलंकार म्हणणे इष्ट होईल.

पुढील सहाव्या ओवीतही व्यतिरेकी रूपकाच्याचद्वारा ज्ञानेश्वर सज्जनांचं चित्रीकरण करीत आहेत. म्हणूनच ते सज्जनांना अलांछित चंद्रमे किंवा तापहीन मार्तंड म्हणत आहेत. या ओवीतील उपमानांचा वर्षाव करताना ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेने पृथ्वीवरून आकाशाकडे झेप घेतली आहे. संत म्हणजे गुरू; गुरू हे विश्वात्मक ईश्वराचे मूर्तस्वरूपच. म्हणून संत केवळ पृथ्वीच्या उद्धारासाठी नाहीत, तर संपूर्ण विश्वाच्या उद्धारासाठी आहेत. या विश्वाचे प्रतीक असलेले चंद्रमे आणि सूर्य यांना संतांची प्रतिकृती मानता येईल; परंतु त्यासाठी चंद्रम्यांचं लांछन नष्ट झालं पाहिजे आणि सूर्य तेजस्वी राहूनही तापहीन झाले पाहिजेत. थोडक्यात सज्जन हे कल्पवृक्ष, चिंतामणी व अमृतसागर यांच्याप्रमाणेच चंद्रमे आणि मार्तंड यांच्याहूनही श्रेष्ठ आहेत. या सर्वांचे एकेक असलेले गुण सज्जनांच्या ठिकाणी संपूर्णतः एकवटलेले आहेत.

**शब्दविश्लेषण**

शब्दांच्या अर्थाकडून शब्दांच्या आकाराकडे व व्युत्पत्तीकडे आले, तरी आपणांला पसायदानाची आणखी एक मनोवेधकता दिसू लागते. आकार आणि व्युत्पत्ती लक्षात घेऊन केलेले पसायदानातील शब्दांचे विश्लेषण असे दिसते :

**पसायदानातील शब्दांचे विश्लेषण**

| शब्दांचा आकार व्युत्पत्ती | तत्सम | तद्भव | एकूण शब्द |
|---|---|---|---|
| एक अक्षरी | ० | ८ | ८ |
| दोन अक्षरी | १० | २१ | ३१ |
| तीन अक्षरी | १७ | १३ | ३० |
| चार अक्षरी | ९ | ४ | १३ |
| पाच अक्षरी | ४ | १ | ५ |
| सहा अक्षरी | २ | ० | २ |
| सात अक्षरी | १ | ० | १ |
| आठ अक्षरी | ० | १ | १ |
| एकूण शब्द | ४३ | ४८ | ९१ |





अनुक्रमणिका

वरील विश्लेषणाच्या आधारावर असे निष्कर्ष निघू शकतात :

१) पसायदानाची भाषा संस्कृतप्रचुर आहे. तीमध्ये तत्सम व तद्भव शब्दांचे प्रमाण जवळ जवळ सारखेच म्हणजे पन्नास-पन्नास टक्के आहे. तद्भव शब्दांत चार शब्दांची पुनरुक्ती झाल्याचे दिसते. म्हणजे तद्भव शब्दांची संख्या ४४ होते, तर तत्सम शब्दांची संख्या ४३ आहे. म्हणजेच तत्सम व तद्भव शब्दांचा योग्य समतोल राखला गेला आहे.

२) भाषा संस्कृतप्रचुर असूनही बिलकुल क्लिष्ट नाही. 'आरव' सारखा एखाद-दुसरा शब्द सोडला, तर या गीतात योजिलेले बहुतेक सर्व शब्द मराठीने आत्मसात केलेले आहेत. त्यातही जुन्या मराठीची क्लिष्ट किंवा अपरिचित रूपे येथे आढळून येत नाहीत. त्यामुळे गीताची भाषा स्वाभाविकच प्रासादिक झाली आहे.

३) या गीताची रचना प्रासादिक होण्याचे आणखीही एक कारण आहे. ते म्हणजे शब्दांचा आकार. गीतातील बहुसंख्य शब्दांतील (७७%) अक्षरांची संख्या ३ किंवा त्यापेक्षा कमी आहे. चार अक्षरे किंवा त्यापेक्षा कमी अक्षरे असलेल्या शब्दांची संख्या तर ९१% आहे. याहूनही आकाराने मोठ्या असलेल्या 'आदिपुरुषी', 'ईश्वरनिष्ठांची' अशा सामासिक शब्दांची फोड सुलभपणे करता येते. म्हणूनच या गीताची रचना प्रासादिक होण्यास मदत मिळाली आहे.

**वर्णविश्लेषण**

शब्दांकडून आपण वर्णाकडे आलो आणि थोडे बारकाईने पाहू लागलो की आपणांला या गीतातील शब्दांना नादमाधुर्य का आले आहे, याचे कोडे उलगडू लागते. प्रत्येक ओवीतील प्रत्येक ओळीत काही विशिष्ट स्वरांचा प्रादुर्भाव दिसतो. त्याच त्याच स्वराच्या पुनरुक्तीमुळे त्या त्या ओळीस माधुर्य प्राप्त झाले आहे. या दृष्टीने या ओव्यांकडे पाहिल्यास असे दिसून येते.

| ओवी क्रमांक | ओळीचा क्रमांक | प्रादुर्भाव असलेले स्वर |
|---|---|---|
| १ | १ | आ; ए |
| १ | २ | अ; ए |
| २ | १ | ए; आ |
| २ | २ | अ; ए |
| ३ | १ | इ, अ, आ |
| ३ | २ | आ |
| ४ | १ | अ, इ / ई |
| ४ | २ | अ, उ / ऊ |
| ५ | १ | आ, अ |
| ५ | २ | अ, ए |

| | | |
|---|---|---|
| ६ | १ | अ, आ |
| ६ | २ | अ, आ |
| ७ | १ | इ / ई, उ / ऊ |
| ७ | २ | इ ..' ई , अ |
| ८ | १ | इ / ई, ए |
| ८ | २ | येथे कोणत्याही एका स्वराचा प्रादुर्भाव नसून ऋ, इ/ई, आ व ए हे स्वर प्रत्येकी दोन वेळा आले आहेत. परंतु त्यामुळेही समतोल राखता गेल्याने नादमाधुर्य आले आहे. |
| ९ | १ | ए, ओ / ऊ |
| ९ | २ | ए, आ |

स्वरांप्रमाणेच व्यंजनांचीही पुनरुक्ती केल्याने पसायदानातील रचना अनुप्रासयुक्त झाली आहे व तिला एक आगळे नादमाधुर्य प्राप्त झाले आहे. हे अनुप्रासही ओढून ताणून आणलेले नसून स्वाभविकरीत्या समर्पक शब्दांचा उपयोग करता करता निर्माण झालेले आहेत. उदाहरणार्थ, अगदी पहिल्याच ओळीतील 'त्' ची पुनरुक्ती पाहा, याबरोबरच एकाच गटातील वर्ण आल्यानेही नादमाधुर्य वाढते. येथे दंत्य गटातील त् व द् या वर्णांची पुनरुक्ती दिसून येते.

या दृष्टीने अन्य ओव्यांचे परीक्षण केल्यावर खालील गोष्टी नजरेस येतात.

| ओवी क्रमांक | पुनरुक्त वर्ण |
|---|---|
| २ | प्रतिवेष्टित : ड्, ढ् |
| | ओष्ठ्य : म्, भ्, प् |
| ३ | दंत्य : त्, द् |
| ४ | घर्षक : ष्, श्, स |
| | ओष्ठ्य : भ् |
| ५ | तालव्य/दंतमूलीय : छ् |
| ६ | " : च्, ज्, ल् |
| | दंत्य : त्, न् |
| | घर्षक : स् |
| ७ | घर्षक : ह् |
| ८ | अर्धस्वर : य्, व् |
| ९ | घर्षक : श् स् |

याशिवाय काही काही शब्दांतून त्यांच्या जोड्यांतून किंवा मालिकांतून ज्ञानेश्वरांनी सहजपणे प्रासयुक्त रचना केली आहे; जसे : स्वधर्मसूर्यो पाहो ( ओवी ३); भूतली भेटोतु भूता (ओवी४); चेतवाचिंतामणीचे (ओवी ५); सर्वां ही सदा सज्जन सोयरे (ओवी ६); लोकी इये (ओवी८) विश्वेसरू राऊ (ओवी ९), हा होईल (ओवी ९)

अशा रीतीने ज्ञानेश्वरांची वर्णरचना ही प्रासयुक्त असल्याने नादमधुर झालेली आहे. त्यालाच यमकाचीही जोड असल्याने या नादमाधुर्यात अधिक गोडी निर्माण झाली आहे.

**व्याकरण आणि निरंकुशता**

पसायदानातील ओव्यांचा व्याकरणाच्या दृष्टिकोनातून अभ्यास करणेही रसप्रद आहे; मात्र येथे जो आनंद मिळतो, तो ज्ञानेश्वरांनी कवीला मिळालेल्या निरंकुशतेच्या अधिकाराचा जो समर्पक आणि प्रभावी उपयोग केला आहे, त्यामुळे कवीने आपले काव्य व्याकरणाच्या नियमांनी बंदिस्त करून ठेवायला सुरुवात केली, तर त्यातील काव्यात्मक सौंदर्य केव्हाच लुप्त पावेल व ते एक रूक्ष गद्य होईल. ज्ञानेश्वर हे तर हाडाचे कवी! असला रूक्षपणा ते आपल्या काव्यात आणू कसा देतील? पसायदानातल्याच ज्ञानेश्वरांच्या भाषेत बोलायचे, तर ज्ञानेश्वरीत काव्यकल्पवृक्षांचे अनेक बगीचे मोहरून आलेले आहेत. तेथल्या शब्दपुष्पांचा सुगंध अपूर्व आहे, तर अर्थरूपी फळांच्या रसाची मधुरताही काही आगळीच आहे. हे माधुर्य येण्याचे कारण म्हणजे ज्ञानेश्वरांनी आवश्यकतेप्रमाणे व्याकरणांचे नियम बाजूला ठेवून केलेली मनोवेधक वाक्य आणि पदबंध-रचना. या गीतातूनही ज्ञानेश्वरांच्या या शैलीचे मोठे मनोरम दर्शन घडते. त्याचा थोडासा आस्वाद आपण पूर्वी घेतला आहेच (पृ.६-७) आता जरा सविस्तर आस्वाद घेऊ या.

वाक्यरचनेचा विचार केला, तर पसायदानात फक्त तीन वाक्ये आढळून येतात. त्यांचे प्रकार आणि आकार यांत मात्र खूपच भिन्नता आढळून येते. पहिले वाक्य आठ ओव्यांचे आहे. हे मोठे वाक्य संयुक्तमिश्र वाक्य आहे. यांतील पहिले मुख्य वाक्य छोटे आहे, ते पहिल्याच ओवीच्या पहिल्या दोन चरणांत आले आहे. ते अगदी सरळ आहे, व्याकरणाच्या नियमात बसणारे :

आता विश्वात्मके देव एणे वाग्यज्ञे तोषावे

दुसरे मुख्य वाक्य मात्र केवल वाक्य नसून ते मिश्र वाक्य आहे. या मिश्र वाक्यात 'तोखौनि मज देयावे। पसायदान हें।' हे एक मुख्य वाक्य असून बाकीची सात विशेषण उपवाक्ये आहेत. ही सात उपवाक्येही सारख्याच आकाराची नाहीत. कधी कधी एकाच ओवीत दोन उपवाक्ये आहेत (ओवी १) तर कधी कधी दोन ओव्यांत एकच उपवाक्य आहे (ओव्या ५ व ६). कधी कधी उपवाक्य एकच असते; पण त्याच्या अंतर्गत २-३ उपवाक्ये असून ती 'आणि' ह्या अध्याहृत समयोगी उभयान्वयीने जोडलेली आहेत. 'आणि' चा प्रत्यक्ष उपयोग फक्त एकदाच समुचितपणे अगदी शेवटचे उपवाक्य

जोडताना ८ व्या ओवीत करण्यात आला आहे. या गीतातील उपवाक्ये ओवीनुसार अशी दाखविता येतील :

| उपवाक्य क्र. | उपवाक्य स्पष्टीकरण | ओवी क्रमांक |
|---|---|---|
| १) | जे खळांची .....वाढे। (दोन उपवाक्ये 'आणि' या अध्याहृत उभयान्वयीने जोडलेली) | २ |
| २) | भूतां ...... जीवाचे। | २ |
| ३) | दुरिताचे...... प्राणिजात। (तीन उपवाक्ये 'आणि' या अध्याह्रत उभयान्वयीने जोडलेली; एकूण चार उपवाक्ये) | ३ |
| ४) | वर्षते...... भूतां। | ४ |
| ५) | चलां..... सोयरे होंतु। | ५ व ६ |
| ६) | किंबहुना ..... अखंडित। | ७ |
| ७) | आणि ...... होआवें जी। | ८ |

आपल्या अभिव्यक्तीचा आशय लक्षात घेऊन ज्ञानेश्वरांनी आपल्या उपवाक्यांचा आकार लहान-मोठा केला आहे, हे यावरून स्पष्ट होईल. 'भूतां परस्परे पडे। मैत्र जीवाचे।।' (ओवी२)

हे अगदी छोटे उपवाक्य आहे, तर ५ व्या व ६ व्या या दोन्ही ओव्यांत सज्जनांचे बहारदार वर्णन व्यतिरेकी रूपकांच्या साहाय्याने फक्त एकाच उपवाक्यात केले आहे. उपवाक्य छोटे असो, की मोठे, त्याची गोडी मात्र अवर्णनीय आहे. हेच तर ज्ञानेश्वरांचे खरे कौशल्य.

या संयुक्त-मिश्र वाक्याची रचनाही सर्वसामान्य मराठी वाक्यरचनेप्रमाणे केलेली नाही. मराठीत/गौण वाक्ये आधी व मुख्य वाक्य शेवटी येते. येथे मात्र सुरुवात मुख्य वाक्याने झाली आहे. 'तोखौनि मज देयावें। पसायदान हें। (ओवी१) व नंतर गौण वाक्यांची मालिका लागली आहे - ओळीने आठव्या ओवीपर्यंत. 'जे' हे गौणयोगी उभयान्वयी। फक्त 'जें खळांची वांकुडै मोडे।...वाढे' या सुरुवातीच्या उपवाक्यातच प्रत्यक्ष आले आहे; बाकीच्या वर निर्देशित केलेल्या सहाही उपवाक्यात ते अध्याहृतपणे घ्यावे लागते. अशी रचना आपणांस इंग्रजी किंवा हिंदी भाषेत दिसून येते. पण त्या रचनेचा प्रभावी उपयोग ज्ञानेश्वरांनी या गीतात समर्पकपणे केलेला दिसून येतो.

'तोखौनि मज देयावे। पसायदाने हे।' या वाक्यात पदबंधरचनेचा क्रमही ज्ञानेश्वरांनी बदलला आहे. कर्म हे क्रियापदानंतर ठेवले आहे व कर्मांतर्गत नामपदबंधात प्रथम नाम (पसायदान), तर नंतर त्याचे स्पष्टीकरण करणारे दर्शक सार्वनामिक विशेषण (हे) ठेवले आहे. 'पसायदान हे' असा या गीतातील पहिल्याच ओवीच्या शेवटच्या चरणात आलेला नामपदबंध ज्ञानेश्वरांच्या मनातला आशय





अनुक्रमणिका

आपल्याला अगदी प्रभावीपणे ज्ञात करून देतो.

याच संयुक्त-मिश्र वाक्यातील काही उपवाक्यांची रचना करताना पारंपरिक व्याकरणाचे नियम बाजूला ठेवून ज्ञानेश्वरांनी विशिष्ट शब्दांवर जोर देण्यासाठी पदबंधांचे किंवा पदांचे जे अनुक्रम बदलले आहेत, त्याची आणखी काही उदाहरणे पाहू:

१) क्रियापद + कर्म : पडे मैत्र जीवाचे (ओवी २)

२) नाम + '-चे' प्रत्ययान्त विशेषण : मैत्र जीवाचे (ओवी २)

३) क्रियापद .....कर्ता : वांछिल..प्राणिजात (ओवी३)

४) क्रियापद + कर्म + कर्ता : वर्षते सर्वमंगली ईश्वरनिष्ठांची मांदियाळी

५) क्रियापद + कर्म : भेटोतु भूतां (ओवी ४)

६) दर्शक सर्वनाम..... नाम : ते....सज्ञन (ओवी ६)

७) कर्ता + क्रियापद + स्थलवाचक क्रियाविशेषण + रीतिवाचक क्रियाविशेषः

...तिर्हि लोकिं। भजिजो आदिपुरुषीं। अखंडित॥ (ओवी ७)

८) कर्ता + वाक्यव्याप्तिवाचक + क्रियाविशेषणपदबंधः

....ग्रंथोपजीविये, विशेषें लोकीं इये। (ओवी८)

ज्ञानेश्वरांनी याप्रमाणे आपल्या बंडखोर स्वभावाला अनुसरून वाक्यरचनेचे व पदबंधरचनेचे पारंपरिक व्याकरणिक नियम झुगारून दिले आहेत; परंतु त्यांच्या ह्या बंडखोरीमुळेच या गीतातील शब्दांना नवी धार आली आहे. शब्द आणि त्यांचा आशय हृदयाला कसा झटकन जाऊन भिडतो! ज्ञानेश्वर व्याकरण पाहत बसले असते तर काव्यात्मकता आणि रसात्मकता रसातळालाच गेली असती.

या गीतातील पहिले वाक्य असे मोठे आहे, संयुक्त-मिश्र आहे; पहिल्या आठ ओव्यांना ते व्यापून टाकते. परंतु हे असे लांबलचक संयुक्त-मिश्र वाक्य आहे, असे बाह्यतः वाटत नाही. याचे मुख्य कारण म्हणजे, यातील बहुतेक उपवाक्ये अगदी लहान तीन-चार शब्दांचीच आहेत. दुसरे म्हणजे, 'जें' या गौणयोगी उभयान्वयीची व 'आणि' या समयोगी उभयान्वयीची पुनरावृत्ती ज्ञानेश्वरांनी कटाक्षाने टाळली आहे. त्यामुळे हे गीत म्हणते छोट्या छोट्या केवल वाक्यांचाच एक सुंदर पुष्पगुच्छ असे वरवर पाहिल्यावर वाटते.उरलेली दोन वाक्ये मात्र मूलतःच अगदी छोटी आहेत. ती नवव्या ओळीत आली आहेत. 'एथ म्हणे विश्वेसरू राऊ। हा होईल दाओ पसाऊ। हे मिश्र वाक्य आहे. 'की' हे गौणयोगी उभयान्वयी 'म्हणे' या क्रियापदानंतर अध्याहृत आहे. 'एणे वचने ज्ञानदेवो सुखिया जाला' हे केवल वाक्य ह्याच ओवीत आले आहे.

या गीतातील खरी खुमारी पहिल्या आठ ओव्यांत आहे आणि या ठिकाणी आपण सविस्तररीत्या पाहिल्याप्रमाणे ज्ञानेश्वरांनी व्याकरणाला झुगारून देत देत एक आगळेच भाषाकौशल्य व्यक्त केले आहे, हे मान्य करावे लागेल.

**पसायदानाची अवीट गोडी**

पसायदानाची अवीट गोडी मात्र ज्ञानेश्वरांच्या एका संकल्पनेत आहे - ती

संकल्पना आहे संतोषाची, सुखाची. शाश्वत सुखाची प्राप्ती करून घेणं हे तर ज्ञानेश्वरांच्या दृष्टीनं जीवनाचं ध्येय. ज्ञानेश्वरीची निर्मिती झाली, ती यासाठीच. सर्व जनतेला आपल्याला गवसलेल्या ह्या शाश्वत सुखाचा लाभ करून देण्यासाठी! ज्ञानेश्वरीचा हा वाग्यज्ञ पुरा झाल्यावर ज्ञानेश्वरांनी आपल्या विश्वात्मक गुरुदेवांपाशी अन्य काय मागितले असणार? हाच संतोष! हेच सुख!

परंतु संतोषाचा हा प्रसादही ज्ञानेश्वरांना सद्गुरूंनी प्रसन्न अंतःकरणाने दिलेला पाहिजे. म्हणूनच ज्ञानेश्वर म्हणतात - "एणे वाग्यज्ञे तोषावे। तोखौनि मज देयावे। पसायदान हे।।"

पसायदानातील संतोष संकल्पनेची दृढता 'तोषावे, तोखौनि' या पुनरुक्तीमुळे आपल्या मनावर सुरुवातीस ठसली जाते. पुढे दुसऱ्या व तिसऱ्या ओवीत व्यक्तिगत संतोषाचे तर ४ ते ५ या ओव्यांत सामाजिक संतोषाचे आध्यात्मिक तसेच काव्यमय निरूपण आहे. 'वांछिल तें तें लाहो। प्राणिजात।।' (३) व 'ते सर्वां हीं सदा सज्जन। सोयरे होंतु।।' (६) या पंक्तीतून ज्ञानेश्वरांनी ह्या व्यक्तिगत व समाजगत संतोषाचेच सुमधुर वर्णन केले आहे. ह्या संतोषात साध्य- साधन एकरूपता दृष्टीस पडते. जे साध्य करावयाचे, त्याचे साधनही तेच आहे. प्रत्येक व्यक्तीजवळच ते आहे; पण ते त्याला गवसत नाही. त्यासाठी सत्संगी रती वाढवावी लागते, दुरिताचे तिमिर घालवावे लागते व विश्वाकडे स्वधर्मसूर्याच्या साहाय्याने पाहावे लागते; मग सुखाचीच बरसात आहे; कारण ईश्वरनिष्ठा सज्जनांचे थवेच्या थवे भेटणार व त्यांच्याद्वारा पृथ्वीवर चालत्या बोलत्या कल्पतरूंच्या बागा, चैतन्यचिंतामणींची गावे व चालत्या बोलत्या अमृतांचे सागर निर्माण होणार. मग सुखाला कोठला तोटा?

अशा वेळी त्रैलोक्यातील प्रत्येक जण सर्व सुखांनी परिपूर्ण होऊन आदिपुरुषाचे अखंड भजन करीत राहणार (७). त्यांना या भजनासाठी मदत करणार, तो हा ज्ञानेश्वरी ग्रंथ - ज्ञानेश्वरांचा वाग्यज्ञ! या ग्रंथाच्या साहाय्याने सामान्यांतला सामान्य माणूससुद्धा ऐहिक आणि पारमार्थिक क्षेत्रांत विजय पावून सुखी होणार. ज्ञानेश्वरांना गुरुदेवांचा प्रसाद पाहिजे, तो हाच. तोच गुरुदेवांनी आनंदाने दिल्यावर ज्ञानेश्वरही पूर्ण सुखी झाले. म्हणून ते अत्यंत आनंदाने व सार्थ अभिमानाने म्हणतात :

'एणें वचनें ज्ञानदेवो। सुखिया जाला।। (९)

पसायदानाची ही चरमसीमा! हीच चरमसीमा ज्ञानेश्वरीची व ज्ञानेश्वरांच्या जीवनाची! हीच चरमसीमा त्यांनी दाखविलेल्या मानवजातीच्या अभ्युदयाची! येथे काय असेल, तर तो फक्त संतोष - परिपूर्ण सुख! शाश्वत सुख!

पसायदानातल्या पंक्तींपंक्तीतून, शब्दाशब्दांतून, अक्षराअक्षरांतून व वर्णावर्णांतून ते उफाळून येते - हीच पसायदानाची अवीट गोडी!

**११७०/१०, शिवाजीनगर, पुणे ४११००५**



# व्हॅलन्स थिअरी : एक प्रतिक्रिया

**– शैलेश सदाशिव पुंडलिक**

ल्यूसियाँ ताँस्निएर (१८९३-१९५४) या फ्रेंच भाषावैज्ञानिकाच्या धारणाक्षमता या उपपत्तीच्या स्पष्टीकरणात श्रीमती नीती बडवे यांनी 'भाषा आणि जीवन' च्या १९९५ च्या दिवाळी अंकात (पृ. ५-२१) काही महत्त्वाचे मुद्दे मांडलेले आहेत. त्यांच्या संदर्भात इतरही काही वेगळे मुद्दे लक्षात घेणे आवश्यक आहे, म्हणून ते वाचकांसमोर ठेवीत आहे.

१) अ) क्रियापदांच्या सर्वोच्च नियंत्रकत्वासंबंधी काही आक्षेप स्वतः श्रीमती बडवे यांनीच पृ. ११ वर नोंदविलेले आहेत.

इतर काही आक्षेप याप्रमाणे :

ब) क्रियापद स्वतःबद्दल **कुणी, कुणाला** वगैरेसारखे प्रश्न उपस्थित करते, हे खरे; पण तसे पाहिले, तर नामासंबंधी सुद्धा **कसा, कुठे, काय करीत आहे** यांसारखे प्रश्न निर्माण होतच असतात. त्यामुळे क्रियापद इतर पदांचे नियंत्रण करते, हे म्हणणे जितके सयुक्तिक आहे, तितकेच नाम इतर पदांचे नियंत्रण करते, असे म्हणणेही सयुक्तिक आहे.

क) क्रियापदाच्या सर्वोच्चत्वामुळे ताँस्निएर उच्चस्तरीय, निम्नस्तरीय असे वर्गीकरण करताना आढळतात ते Value judgement असल्यासारखे वाटते; पण विज्ञानात अशी judgements उपपन्न होत नाहीत.

२) अ) ताँस्निएर आपल्या उपपत्तीला संरचनावादी असे म्हणतात. प्रत्यक्षात त्यांनी विश्लेषण आणि वर्गीकरणासाठी वापरलेले निकष (शब्दांचे अर्थ, त्यांची कार्ये, इ. इ.) अर्थवैन्यासिक आहेत. त्यांनी मानलेले नातेसंबंधांचे (connexion) आकलन हे सुद्धा पूर्णपणे अमूर्त आणि काल्पनीय (conceptual) आहे.

ब) ताँस्निएर यांच्या मानसिकतावादाचे दुसरे उदाहरण म्हणजे त्यांच्या दृष्टीने क्रियापदासंबंधीच्या प्रश्नांना उत्तरे मिळाल्याखेरीज वाक्य घडूच शकत नाही. त्यांच्या विवेचनात morphological किंवा syntactical असे काही नाही.

क) Valence च्या उपपत्तीत संरचनावाद खऱ्या अर्थाने नसल्यामुळे वरवर बाह्यतः दिसणाऱ्या खुणांच्या आधारे वाक्यांगांचे एकमेकांशी असलेले संबंध दाखविण्याचा प्रयत्न केला जातो. उदा., शिरीष पडला, शिरीष स्कूटरवरून पडला, शिरीष खड्ड्यात पडला. यांत शिरीषची (विभक्ती) प्रथमा असल्याने तो कर्ता आहे, असे म्हणता येईल का? जीव भांड्यात पडणे हा एक वाक्प्रचार आहे. ते एक एकक आहे. जीव हा एक पदार्थ असून, तो भांड्याच्या दिशेने जाऊन त्यात पडतो, असे कुणीही मानीत नाही. त्यात जीव हा कर्ता, भांड्यात हे दिशादर्शन वगैरे संकल्पना मांडणे अशक्य आहे. हे सर्व लक्षात घेतले, तर तॉस्निएर यांचा रचनावाद आणि पारंपरिक अर्थवैन्यासिक व्याकरण यांच्यांत फरक करणे फार अवघड वाटते.

३) अ) उच्चस्तरीय, समस्तरीय, इ. शब्दांची तॉस्निएर यांनी व्याख्या केलेली नाही, त्यामुळे आल्फ्रेड, रोज वगैरे शब्द समस्तरीय आहेत, म्हणजे ते कसे आहेत, हे समजू शकत नाही.

ब) प्रत्यक्ष निरीक्षणात असे दिसते, की वाक्यात शब्दांचे छोटे छोटे गट तयार होतात. उदा., वाक्याचे विभाजन करायचे झाले, तर आल्फ्रेड .................. रोज .............. पट्टी-ने ................ ऑटो–ला ................ मारतो, असे करावे लागेल. (टीप – शब्दांमधील डॅशच्या लांबीने त्यांच्यातील संबंधाचे दूरत्व किंवा समीपत्व दाखविले आहे.) म्हणजे ऑटो आणि ला, ऑटोला आणि मारतो, पट्टी आणि ने, पट्टीने आणि ऑटोला मारतो, रोज आणि पट्टीने ऑटोला मारतो आणि शेवटी आल्फ्रेड आणि रोज पट्टीने ऑटोला मारतो या घटकांचे एकमेकांशी तसतसे निकटचे संबंध आहेत. तेव्हा आल्फ्रेड आणि रोज यांचा साक्षात, अप्रतिहत (immediate) असा संबंध नाही. Valence theory प्रमाणे ते समस्तरीय आहेत, म्हणजे एकमेकांशी एकाच नात्याने संबद्ध आहेत, असे म्हणावे लागते, ते उपपन्न होत नाही.

क) 'राजाने ब्राह्मणाला सांगितले, तू उद्या ये, अशा वाक्यात **राजाने**, **ब्राह्मणाला** आणि **ये** (**किंवा ये तू उद्या**) ही सर्व वाक्यांगे समस्तरीय होतात. पण **ये** हे क्रियापद असूनही किंवा **ये तू उद्या** हे वाक्य असूनही दोन नामांशी समस्तरीय कसे होतात, हे सांगण्यासाठी त्यांच्या कार्यांचा विचार मांडलेला आहे. पण **ये तू उद्या** सारखी embedded वाक्ये अनंत



अनुक्रमणिका

असू शकतात. (उदा., This is the house that Jack built .......... that ............ that ............) अशा सर्वच वाक्यांना एका एककात बसविणे अशक्य आहे. दुसरे म्हणजे, नाम आणि क्रियापद यांच्यांतील एकेवेळी फार ठळक वाटणारी रचनावादी सीमारेषा या functional विश्लेषणाने पूर्णपणे पुसली जाते.

४) 'लघुतम परिपूर्ण वाक्य बनविण्यासाठी' क्रियापदाच्या अनुषंगाने येणाऱ्या प्रश्नांची उत्तरे मिळविणे आवश्यक असते, या भूमिकेला तर अनेक आक्षेप घेता येतील. त्यांतील काहींचाच इथे निर्देश करू.

अ) वाक्यातील सर्व शब्द हे आवश्यक म्हणूनच आलेले असतात. तसे नसते, तर त्यांचे अस्तित्व आणि कार्य उपपन्नच होणार नाहीत.

ब) लघुतम परिपूर्ण वाक्याच्या निर्मितीसाठी खुद्द क्रियापदाच्या अस्तित्वाची सुद्धा आवश्यकता नाही. त्यासाठी पुढील उदाहरणे पाहा.

हॉटेलची रूम. सुसज्ज नसली, तरी बऱ्यापैकी. बोलून चालून हिलस्टेशनच ते. (टीप : पहिली दोन वाक्ये चिं. त्र्यं. खानोलकरांची, तिसरे माझे. टीपेतील हे वाक्य सुद्धा माझे. कोणत्याही वाक्यात क्रियापद नाही.)

तात्पर्य : तॉंस्निएर यांनी मराठीचा अभ्यास करायला हवा होता.

क) क्रियापदाचे नामात अतिशय सहज रूपांतर होते. उदा., The enemy conquered the city याचे रूपांतर the conquering of the city by the enemy असे होऊ शकते. तेव्हा क्रियापद आणि नाम यांच्यांत उच्चनीच ठरविणे अशक्य आहे.

तात्पर्य : तॉंस्निएर यांच्या विद्यार्थ्यांनी चॉम्स्की (१९७०) यांचे Remarks on Nominalization वाचणे आवश्यक आहे.

असो, ही वादभूमी नव्हे, तर चर्चासत्र आहे. या विषयावर अजून खूप अभ्यास होणे आवश्यक आहे, असे स्पष्ट दिसते, एवढेच नमूद करून वाचकांना त्या दिशेने प्रयत्न करण्याचे आवाहन करतो.

इत्यलम्.

**भाषाशिक्षण विभाग, एस्.एन्.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई - ४०० ०२०.**

●●●





अनुक्रमणिका

# झापड कोणाच्या डोळ्यांवर आहे ?

– दिवाकर पुरुषोत्तम मोहनी

'भाषा आणि जीवन' च्या हिवाळा, १९९५ च्या अंकात डॉ. गं. ना. जोगळेकर यांचा 'झापडबंद दृष्टिकोन नको' हा श्रीमती सत्त्वशीला सामंत यांच्या लेखाला उत्तर म्हणून लिहिलेला लेख आहे. तो वाचून माझे मुळीच समाधान झाले नाही. त्याचे कारण कदाचित, मी भाषाविज्ञान शिकलेलो नाही, हे असावे. माझ्या असमाधानाची कारणे पुढे दिली आहेत.

डॉ. जोगळेकरांचा लेख हा एक प्रातिनिधिक विचार मांडणारा लेख आहे. विद्यमान भाषाविज्ञानाच्या सर्वच अभ्यासकांचा तसा दृष्टिकोन आहे. डॉ. जोगळेकरांचा एकट्याचा तो विचार नाही. त्यामुळे मी त्यावर जर पुढे टीका केली, तर ती वैयक्तिक टीका नाही असे त्यांनी कृपा करून धरून चालावे, अशी त्यांना नम्र विनंती आहे.

सुरुवातीला थोडी पूर्वपीठिका मांडतो.

आधुनिक भाषाविज्ञान हे शास्त्र मुख्यतः ज्या भाषा लिखित भाषा नाहीत, केवळ बोली आहेत, अशांचे, त्याचप्रमाणे विभिन्न लिखित भाषांच्या उच्चारणाचे अध्ययन करण्यासाठी निर्माण झाले आहे अशी, माझी माहिती आहे. ती जर बरोबर असेल, तर त्याचे नियम लेखनाची दीर्घ परंपरा असलेल्या, पूर्वीच प्रमाणीकृत झालेल्या, ग्रंथनिविष्ट भाषेच्या लेखनाला जसेच्या तसे लागू करणे योग्य होणार नाही, असे मला वाटते. (डॉ. जोगळेकर तसा प्रयास करून त्यासाठी कसरत करीत आहेत, असा माझा त्यांचा लेख वाचून समज झाला.) कारण ते नियम–उच्चारणपद्धतीला सुसंगत असेच लेखन केले पाहिजे, हा मुख्य नियम – बोलीचे पहिल्यानेच लेखन करण्याच्या दृष्टीने केलेले असणार ! जेथे लेखनाची परंपराच नाही, जेथे आशयाची अभिव्यक्ती केवळ आवाजातून आजवर होत आली आहे; ज्याला विभिन्न देशकालांमधील भिन्न भिन्न उच्चारणांचे प्रतिनिधित्व लाभले आहे, अशा लेखनाचा जेथे मूलतःच अभाव आहे, ज्या बोलींचे व्याकरण नव्यानेच होत आहे, त्यांचे लेखन त्यांच्या सांप्रतच्या त्याचप्रमाणे तद्देशीय उच्चारांप्रमाणेच करावे लागणार ! भाषेच्या अभ्यासकाद्वारे त्या बोलीचे लेखन करण्याचा हेतू, ती बोली बोलणाऱ्यांनी आपापल्या मनात ते लेखन वाचून, त्याचा आशय समजून घ्यावा, हा नसतो. ते सारे निरक्षरच असतात. तो लेखकाला त्या भाषेचा शक्य तेवढा यथायोग्य पुनरुच्चार करता यावा, असा असतो, त्यामुळे तो उच्चार त्याला तसा लिहावा लागणार !

याउलट, जिला लेखनाचा शेकडो वर्षांचा दीर्घ इतिहास आहे, पूर्वीपासून लेखनाचे नियम आहेत, जिचे व्याकरण लेखकांना माहीत आहे, जिच्यामध्ये हजारो ग्रंथ आधीच लिहिले वा छापले गेले आहेत, अशा भाषेच्या लेखनाचे नियम अर्थात शुद्धलेखनाचे नियम वेगळ्या पायावर आधारलेले पाहिजेत असे मी मानतो आणि तो पाया कोणत्याही ग्रंथ-निविष्ट भाषेसाठी सारखाच असला पाहिजे, असेही मला वाटते.

शुद्धलेखनाच्या बाबतीत आजवर सगळ्यांकडून (अर्थात त्यांमध्ये डॉ. गं. ना. जोगळेकरही आहेत) दुर्लक्षिला गेलेला एक अत्यंत महत्त्वाचा मुद्दा असा, की लेखन हे डोळ्यांसाठी असते आणि भाषण किंवा बोलणे हे कानांसाठी असते. बोलणे, संभाषण करणे, भाषण देणे हे सर्व ऐकण्यासाठी आहेत, तर लेखन हे डोळ्यांनी वाचण्यासाठी आहे. भाषा एकच असली, तरी ती बोलली जाते, तशी वाचलीही जाते. अशा वेळी ती दोन भिन्न ज्ञानेन्द्रियांना बोध करून देते. त्यामुळे तिचे स्वरूप, तिचा आविष्कार, दोन्ही ठिकाणी भिन्न असतो व तो तसा असावयाला हवा.

कानांना समजणारे संकेत हे पुष्कळ प्राण्यांना निर्माण करता येतात आणि डोळ्यांना समजणारे संकेत हे फक्त मानवाला निर्माण करता येतात.

मानवाच्या इतिहासाचा मागोवा घेतला तर असे लक्षात येईल, की लेखनविद्या ही संभाषण–विद्येच्या मानाने किती तरी अलिकडची आहे आणि लेखन जरी काही सहस्रकांपूर्वी मानवाला माहीत झालेले असले, तरी त्याचे वाचन हे फार थोड्या लोकांनाच करता येत होते. आजदेखील निरक्षरांची संख्या या जगात फार मोठी आहे. ऐकण्याच्या क्रियेपेक्षा वाचनाची क्रिया ही नेहमीच अतिशय अवघड अशी राहिली आहे. प्रौढांना साक्षर करण्याचे प्रयोग आजवर फारच थोड्या मर्यादेपर्यंत यशस्वी झाले आहेत. कारण लक्षात घ्या, की निरक्षरांनी साक्षर होणे हे त्यांच्यासाठी एका संस्कृतीतून दुसऱ्या संस्कृतीत प्रवेश करण्याइतके किंवा नवीन संस्कृती आत्मसात करण्याइतके कठीण असते.

आपल्या भारतात आपण आपापल्या भाषांसाठी भिन्न भिन्न लिपींचा वापर करतो; सीमेवरच्या लोकांना दोन भाषा सहज बोलता येतात. पण त्यांपैकी फार थोडे लोक दोन्ही लिपींमधला मजकूर तितक्याच सहजपणे वाचू शकतात. एकाच लिपीमध्ये छापलेला, दोन वेगवेगळ्या भाषांमध्ये लिहिलेला मजकूर असला, तरी ज्याला त्याला आपल्या भाषेमधला मजकूरच जलदगतीने वाचता येतो. उदा., नागरी लिपीचा वापर करणाऱ्या हिंदी व मराठी या दोन भाषा. या दोनही भाषा समजणारे लोक विपुल संख्येत आहेत, परंतु ते आपल्याखेरीज दुसऱ्या भाषेतील पुस्तके किंवा वृत्तपत्रे तेवढ्याच गतीने वाचू शकत नाहीत. तसेच, इंग्लिशची रोमन आणि मराठीची नागरी लिपी वाचणाऱ्यांचे. या दोनही भाषा किंवा मराठीऐवजी दुसरी एखादी देश्य भाषा वाचणारे काही थोड्या संख्येत आहेत, पण तेही

पुढे पुढे एकच भाषा जास्त आवडीने वाचतात. वेगवेगळ्या लिपी वाचू शकणे एकाच लिपीतील भिन्न भाषा वाचणे व कोणत्याही लिपीतील भाषा जलदगतीने वाचणे या तीन वेगळ्या क्षमता आहेत; आणि त्या असलेल्यांची संख्या मर्यादित आहे. थोडक्यात काय तर लिहिलेल्याचे वाचन हे प्रयत्नसाध्य आहे. सहजसाध्य नाही, हे एकदा नीट समजले, की डोळ्यांच्या संकेतांमध्ये फरक करावयाचा झाला, तर तो किती जपून करावयाला पाहिजे, ते लक्षात येईल. या मुद्द्याचा विस्तार नंतर करण्यात येईल.

भाषणाचे किंवा बोलण्याचे लेखनात रूपांतर करण्याची गरज माणसाला कशासाठी वाटते किंवा वाटली, याचा विचार केल्यास असे लक्षात येते, की आपण त्यातून बोलण्याचे उच्चार जरी दर्शवीत असलो, तरी त्यासोबतच आपल्याला त्या बोलण्यातील किंवा मनातील भावना अथवा विचार यांचा आशय टिकवून ठेवावयाचा असतो व त्यासाठी आपण लेखनाचा आश्रय घेतो. अर्थहीन उच्चार आपण सहसा करीत नाही व कोणी केलेच, तर ते कोणी लिहूनही ठेवीत नाही. सारांश, आपल्याला दुसऱ्यापर्यंत फक्त उच्चार पोहोचवावयाचे नसतात, तर त्यांचा अर्थ किंवा आशय पोहोचवावयाचा असतो. भाषण हे तो आशय दुसऱ्यापर्यंत पोहोचविण्याचे आणि लेखन हे तो आशय चिरकालपर्यंत टिकविण्याचे साधन किंवा माध्यममात्र आहे. भाषण हे सामान्यपणे वाऱ्यावर विरणारे असे असते, तर लेखन हे स्थलकालाच्या मर्यादा ओलांडून जाणारे असे असल्यामुळे ते त्यातील विचारांच्या चिन्तननिदिध्यासास उपयुक्त व त्यातील भावनोत्कर्षाचा व रसोत्पत्तीचा पुनःप्रत्यय आणून देण्यास समर्थ असे असते.

लेखनाचे स्वरूप पाहिले, तर असे लक्षात येते, की त्याच्या टिकाऊपणामुळे आणि ने-आण करण्याच्या सोयीमुळे निरनिराळ्या काळांत व निरनिराळ्या प्रदेशांत निरनिराळ्या बोली बोलणाऱ्या लोकांपर्यंत, तसेच, एकाच भाषेतील शब्दांचे वेगवेगळे उच्चार करणाऱ्यापर्यंत ते पोचते, वाचले जाते, पुनःपुन्हा वाचले जाते, त्याचे अध्ययन-चिन्तन केले जाते. भिन्न भिन्न उच्चारांचे लोक त्याचे वाचन करीत असल्यामुळे त्यांना लेखनातून जो आशय किंवा अर्थ समजतो, तो शब्दांच्या त्या आकृतीवरून समजतो. उच्चारण अशा ठिकाणी गौण ठरते. ते लेखन मोठ्याने वाचावयाचे झाल्यास शब्दांच्या आकृतीमुळे ज्याचे स्मरण होईल, असे उच्चारण प्रकट वाचन करणाऱ्या त्या व्यक्तीच्या मुखाला जशी सवय असेल, तसे होते. म्हणून उच्चारण कसेही किंवा वेगवेगळे झाले, तरी शब्दांच्या त्या आकृतीमुळे निःसंदिग्ध आशयच प्रकट व्हावा, अशी लिखित भाषेकडून असलेली अपेक्षा कायम असते; आणि ती अपेक्षा पूर्ण करण्यासाठीच प्रमाणीकृत भाषा कालौघामध्ये नकळत तयार होत जाते व तिच्या लिखित आकृतींना स्थैर्य येत जाते. भिन्न भिन्न काळांत व प्रदेशांत असणारे विभिन्न उच्चार अशा प्रमाणभाषेमध्ये हुबेहूब दर्शविले जात नाहीत, तर लिखित भाषेतील एकेक शब्द त्याच्या भिन्न प्रदेशांतील विभिन्न उच्चारांचे प्रतिनिधित्व करतो आणि

म्हणूनच सवयीमुळे शब्दांचे उच्चार चुकीचे करणाऱ्यांनाही त्या लिखित शब्दांच्या आकृतींपासून निःसंदिग्ध अर्थ समजतं राहतो. कोणतीही परकीय भाषा शिकताना हाच अनुभव येतो. इतकेच नव्हे, तर जन्मतःच बहिरे असल्यामुळे ज्यांनी शब्दांचे उच्चार कधी ऐकलेच नाहीत, असे लोकदेखील शब्दांच्या लिखित आकृती वाचून त्यांचा अर्थ समजू शकतात. (बहिऱ्या लोकांना परभाषेमधले सिनेमा पाहायला जास्त आवडते, कारण त्यांमध्ये प्रत्येक दृश्याबरोबर त्या त्या वेळचे भाषण खाली लिहून येते.)

या सर्व विवेचनावरून हे निष्पन्न व्हावयाला हरकत नाही, की उच्चार आणि लेखन यांची फारकत झाली, तरी लेखनाचे अर्थवहनाचे काम थांबत नाही किंवा ते बिनबोभाट (म्हणजे खऱ्या, अर्थाने मूकपणे) चालू शकते, चालू राहते. याही पुढे जाऊन असे म्हणता येईल, की मनातही शब्दांचे उच्चारण न करता वाचन करण्याची सवय केल्यासच जलद वा शीघ्र वाचन शक्य होते, असे प्रयोगान्ती सिद्ध झाले आहे. आजच्या युगात शीघ्र वाचन ही एक निकडीची बाब झालेली आहे, हे कोणीही मान्य करील.

या नंतर प्रश्न असा उपस्थित होतो, की मग शुद्धलेखन म्हणजे आहे तरी काय? शुद्धलेखनाच्या व्याख्या आजवर फारशा कोणी केलेल्या नाहीत.

मी केलेली एक व्याख्या डॉ. गं. ना. जोगळेकरांच्या विचारासाठी पुढे मांडतो.

**लेखनाचे सर्वमान्य संकेत पाळून केलेले लेखन ते शुद्धलेखन** हे माझे विधान सर्वमान्य व्हावयाला हरकत नाही, असे मला वाटते. पण ही ढोबळ व्याख्या झाली. ती थोडी आणखी काटेकोर करण्याचा पुढे प्रयत्न करू.

भाषेमध्ये स्वतःचे चैतन्य असावे; आणि तसे ते असते. ती अचेतन, निश्चल किंवा अप्रवाही राहू शकत नाही; व प्रत्येक भाषेची ही सर्वमान्यता देशकालाप्रमाणे बदलू शकते, हेही मला मान्य आहे. तथापि, लिहिण्याच्या संकेतांना ही सर्वमान्यता देताना आपल्या पूर्वजांनी कोणता आधार घेतला असावा, याचा मी जेव्हा शोध घेऊ लागलो, तेव्हा शुद्धलेखन कशास म्हणावे, याबद्दल मला काय वाटले, ते सांगतो. हा विचार मी मराठीत मांडत असलो आणि तो मराठीच्या संदर्भात असला, तरी तो सर्व भाषांना सारखाच लागू होण्याजोगा आहे.

> **'मनातला कोणताही विचार आणि / अथवा भाव स्थलकालाच्या मर्यादा ओलांडून, शब्दांमध्ये यथार्थपणे व निःसंदिग्धपणे व्यक्त करू शकणारे लेखन (वा भाषण) शुद्ध वा प्रमाण होय.'**
>
> 'व्याकरणाच्या नियमांना अनुसरून घडविलेली वाक्ये आणि व्युत्पत्तीच्या (शब्द-सिद्धीच्या) नियमांनी सिद्ध झालेली शब्दांची रूपे वापरल्यामुळे





अनुक्रमणिका

भाषेमध्ये दीर्घकाळपर्यंत निःसंदिग्धता आणि निश्चितार्थता येते, असा अनुभव आहे. किंबहुना **ज्या नियमांमुळे भाषेला सार्वत्रिक आणि चिरकालिक प्रामाण्य येते, त्या नियमांना शुद्धलेखनाचे नियम म्हणावे, म्हणून शब्दांचे अर्थसातत्य कायम राखणारे लेखन हे शुद्धलेखन होय.**'

वरच्या विधानांचा अर्थ असा होतो, की कोणत्याही शब्दांत, कसेही उच्चार करून बोलल्यानंतर ते जर ऐकणाऱ्याला निःसंदिग्धपणे समजत असेल, तर ते शुद्ध भाषण आहे. (येथे स्थलकालाच्या मर्यादा ओलांडल्या जात नाहीत.) वऱ्हाडी ही वऱ्हाडी बोली म्हणून शुद्ध आहे, तसेच मालवणी ही तेथली बोली म्हणून शुद्ध किंवा प्रमाणच आहे. परंतु मराठी म्हणून त्या अप्रमाण ठरू शकतात, कारण काही ठिकाणी काही उच्चारांचा अर्थ अनुमानाने समजावा लागतो किंवा तो चुकीचा लागतो. बोलीला लिहिलेले नियम नसतात, त्यामुळे मनातली शंका फेडून घेता येत नाही. संदेह कायम राहतो. (शुद्धतेचे निकष स्थलकालाप्रमाणे, श्रोतृसमुदायाप्रमाणे किंवा वाचकवर्गाप्रमाणे बदलतात.) ही संदिग्धता शब्दकोश, व्याकरण, इत्यादी संदर्भग्रंथांचा वापर करून दूर केली, की भाषेत सार्वत्रिकता आणि चिरकालिकता येते. यासाठी शब्दकोशात आणि व्याकरणाच्या पुस्तकांतील शब्दांची रूपे लेखनात वापरावी लागतात. वाचताना पुष्कळदा अपरिचित शब्दांशी गाठ पडते. त्यांच्या अर्थाविषयी संदेह निर्माण होतो. हा संदेह घालविण्यासाठी संदर्भग्रंथांचा आश्रय घ्यावा लागतो. नव-नवीन शब्दांना, वाक्प्रचारांना, भाषेच्या लकबींना कोशगत करून, त्यांचे व्याकरण करून, शुद्ध किंवा प्रमाण करून घेता येते. या प्रक्रियेने आजचे अशुद्ध शब्द उद्या शुद्ध होऊ शकतात. म्हणून भाषेच्या प्रमाणीकरणामध्ये कोशांना आणि व्याकरणादी संदर्भग्रंथांना महत्त्व फार आहे. या प्रक्रियेमुळे भाषा प्रवाही व जिवंत राहते व तिची वाढही होत राहते.

प्रदेशानुसार एकाच शब्दाचे निरनिराळे उच्चार होतात, ही गोष्ट इतकी सर्व परिचित आहे, की तिचे उदाहरण देण्याची गरज पडू नये. तरी येथे एक-दोन उदाहरणे देतो, 'मी यू का, तू ज्यून घे, बघ, तो मानूस पडून ऱ्हायला हाए' असे शब्द वाचून 'मी येऊ काय, तू जेवून घे, बघ, तो माणूस पळून राहिला आहे म्हणजे पळत आहे' असा त्यांचा अर्थ आहे, हे कळणे जवळजवळ अशक्य आहे. 'पळणे' हे क्रियापद मराठी भाषेतले आहे. त्यातल्या 'ळ' या वर्णाचा उच्चार ड, ड़, य, ई, र इतका वेगवेगळा होतो. खानदेशी लोकांना त्यांच्या उच्चारवैशिष्ट्यामुळे 'गुईदायां' (गूळदाळ्या) वरून चिडविले जात असे, हे आपल्याला माहीत असेल. कोणी 'ण' ऐवजी 'न' आणि तद्विरुद्ध 'न' ऐवजी 'ण' म्हणतात. कोणाला 'ए' व 'ये', तर 'ऊ' व 'वू' मध्ये फरक करता येत नाही. कोणी 'स' ला 'ह' करतात, तर आणखी कोणी श, ष, स मध्ये उलटापालट करतात. उच्चाराप्रमाणे अशी उलटापालट झाली, तरी लेखनामध्ये ती होऊ द्यावयाची नसते. लेखनामध्ये अनेक विभिन्न

उच्चारांपैकी एक त्या सर्व उच्चारांचा प्रतिनिधी म्हणून वापरावयाचा असतो. उदा., तृतीय पुरुषी एकवचनी पुलिंगी सर्वनाम 'तो' 'ते' 'तो' प्रमाणेच त्यो, धो, थ्यो असेही उच्चारले जाते. त्या चारही उच्चारांचा लेखनातील प्रतिनिधी – तो. 'तो' उच्चार अथवा 'तो' प्रतिनिधी त्या चार समकक्ष उच्चारांपैकी एक आहे. त्या चतुर्विध उच्चारांपैकी जो पहिल्याने ग्रंथगत झाला, त्याला प्रामाण्य मिळाले.

वरील उदाहरणांवरून असे लक्षात येईल, की एक शब्द एकाच विशिष्ट पद्धतीने त्याच संदर्भात पुन्हा पुन्हा म्हणजे सतत लिहिला गेला, तर त्याचे अर्थाशी असलेले नाते दृढतर होत जाते आणि स्थलकालानुरूप बदलणाऱ्या उच्चारांशी असलेले नाते शिथिल होत जाते. उच्चारांचे हुबेहूब प्रतिबिम्ब लेखनात पडेनासे होते. प्रतिनिधी म्हणून लेखनात आलेल्या शब्दांच्या ठिकाणी अर्थसातत्य निर्माण होते. असा शब्द केवळ प्रतिनिधी असतो. मूळ उच्चार आणि त्यांचा प्रतिनिधी यांत श्रेष्ठ-कनिष्ठ-भाव असण्याचे काहीच कारण नाही. हे प्रतिनिधित्वाचे आणि लिखित शब्दांच्या ठिकाणी असलेल्या अर्थसातत्याचे महत्त्व न जाणल्यामुळे आणि काही लोकांनी प्रमाण भाषेला शिष्ट लोकांची सभोचित भाषा असे म्हटल्यामुळे मराठी भाषेचे अतोनात नुकसान झाले आहे. प्रतिनिधी केवळ दूत आहे. तो इतरांपेक्षा श्रेष्ठ कसा असेल?

डॉ. जोगळेकरांच्या मूळ लेखापासून मी बराच दूर गेलो आहे, जात चाललो आहे, त्याची मला जाणीव आहे. त्यांच्या लेखात या सर्व मुद्द्यांचा उल्लेख नाही. पण शुद्धलेखनाच्या स्वरूपाविषयी एकूणच जे गैरसमज आहेत, त्यांतल्या त्यांत मराठी भाषकांचे जास्त आहेत, फार पूर्वीपासून आहेत, निदान गेली शंभर वर्षे आहेत, शिवाय ज्यांतून साहित्यसम्राट न. चिं. केळकर व तिकडचे बर्नार्ड शॉ हेसुद्धा सुटलेले नाहीत; त्या शुद्धलेखनाच्या अंगांचा, त्या मुद्द्यांचा परामर्श या चर्चेच्या निमित्ताने घ्यावा, आपले म्हणणे मांडून टाकावे, अशी मला इच्छा झाली आहे.

यानंतर भाषेच्या लेखन–नियमांच्या सुलभीकरणाचा मुद्दा घेऊ. सुलभीकरण कशाचे? नियमांचे, की नियम शिकविण्याच्या पद्धतीचे? पद्धतीचे सुलभीकरण मला मान्य आहे. नियमांचे नाही. नियमांचे सुलभीकरण आणि तेही कायमचे करण्याचा आग्रह धरल्यास, ते ज्यांच्यासाठी करावयाचे, त्यांच्या आकलनशक्तीविषयी, बुद्धिमत्तेविषयी शंका व्यक्त केल्यासारखे होते. ते मला मुळीच करावयाचे नाही.

भाषेचे नियम हे गणिताच्या सूत्रांसारखे आहेत. सूत्रे प्रारंभी कठीण वाटली, तरी ती शिकल्याने जास्त गणित आटोक्यात येते. तसेच व्याकरणाचे आहे. उच्च श्रेणीचे गणित सगळ्यांना येत नाही, म्हणून गणिताची सूत्रे बदलावयाची नसतात. व्याकरण पूर्वी लिहून झालेल्या भाषेचे असते व भाषेचा प्रवाह अखंडित चालू ठेवावयाचा असतो. त्यामुळे

जुने नियम रद्द करता येत नाहीत. त्यांत गरज पडल्यास भर घालता येते. जुने नियम चूक, असे म्हटल्याबरोबर मूळ भाषेचा प्रवाह खंडित होतो. (निदान मला असे वाटते.)

सगळ्यांना जसे चांगले, शास्त्रपूत गाता येत नाही, तसे सगळ्यांना शास्त्रशुद्ध लिहिता येत नाही. पूर्वी हे मान्यच होते. त्याची जाण होती व जे लोक उत्तम, शास्त्रपूत पद्धतीने लिहीत, त्यांची वाहवा होत होती.

शब्द एकदा कोशगत झाला, त्याचे व्याकरण झाले, म्हणजे तो कसा चालवावयाचा, हे ठरून गेले व त्याची ग्रंथात नोंद झाली, की तो कायमचा प्रमाण होतो. नंतर तो कधी मागे पडतो, वापरातून जाऊ शकतो, पण तो अप्रमाण होत नाही. तो archaic होतो; पण destandardise होत नाही, असे माझे मत आहे. शुद्धलेखनाच्या नवीन नियमांप्रमाणे जुन्या रूपांना अप्रमाणित केले गेले, ही महामंडळाची चूक झाली आहे. उदा. तृतीयेचे प्रत्यय नें, एं, शीं आणि आं असे पूर्वी होते. ते व्याकरणाच्या पुस्तकांमध्ये आलेले आहेत. तृतीया विभक्तीसाठी त्यांपैकी कोणताही एक प्रत्यय वापरण्याची लेखकाला मुभा होती. आज तुम्ही 'ने' असा आणखी एक प्रत्यय फार तर पर्यायी किंवा विकल्प म्हणून मान्य करून शकता व लेखकाला कोणताही एक पर्याय उपलब्ध करून देऊ शकता. पण नें, एं, शीं, आं हे प्रत्यय वापरणे चूक आहे, असे ठरवू शकत नाही. कारण ते चूक आहेत व म्हणून ते वापरावयाचेच नाहीत, असे ठरवून त्यांच्या जागी नवे नियम आणल्याबरोबर जुनी मराठी भाषा आणि नवी मराठी भाषा (नव्हे बोली) या एकमेकींपासून वेगळ्या होतात किंवा जुनी भाषा मराठी नव्हेच, असे म्हटल्यासारखे होते. त्या जुन्या लिहिल्या गेलेल्या भाषेची परंपरा नष्ट होते, प्रवाह खंडित होतो. एवढ्यासाठी नवीन नियम करावयाचेच झाले, तर ते केवळ शिफारसवजा असावेत; त्याबरोबर जुने नियम चूक किंवा दंडार्ह, असा आग्रह नको. नवनवीन नियमांनुसार लिहिली गेलेली त्याच त्या शब्दांची बदलती रूपे वाचताना शब्दांतील अर्थसातत्य नष्ट होतेच; शिवाय प्रत्येक शब्द निरखून वाचावा लागल्यामुळे वाचकाच्या डोळ्यांना त्याचा अपरिहार्यपणे शीण होतो. म्हणून शिफारसवजा करावयाचे नियम सुद्धा अत्यंत काळजीपूर्वक करावे लागतात.

या संदर्भात आणखी एक स्वतंत्र मुद्दा मला मांडावसा वाटतो.

आपण असे समजू या, की दोघेजण मैफिलीत बसले आहेत. दोघांनाही संगीतामध्ये रुची आहे; पण दोघांपैकी एक संगीताचे शास्त्र शिकलेला आहे व दुसरा नाही, जो शिकलेला आहे, त्याला शास्त्रीय संगीत गायनाच्या श्रवणामुळे ते न शिकलेल्यापेक्षा अधिक आनंद होतो; इतकेच नव्हे, तर त्या आनंदाची श्रेणीच वेगळी असते. चित्रकलेचेही असेच आहे. उत्तम चित्रे स्वतः काढता आली नाहीत, तरी चित्रकला शिकलेली व्यक्ती दुसऱ्याने काढलेल्या शास्त्रशुद्ध चित्रापासून निराळ्या श्रेणीचा आनंद उपभोगू शकते. त्याचप्रमाणे

भाषेचे शास्त्र शिकलेल्या वाचकालाही शास्त्रपूत पद्धतीने लिहिलेल्या भाषेच्या वाचनातून तशाच श्रेणीचा आनंद मिळविता येतो. अशी भाषा वाचता वाचता वाक्यातील प्रत्येक शब्दाचे व्याकरण करीत जातो. वाचताना ते नकळत होते. गाणे ऐकताना त्याची सरगम मनात उमटावी, तसे ते घडते. वाक्यातील नामांच्या ठिकाणी लिंगवचनविभक्तीची सर्व लक्षणे दिसली, धातूंच्या रूपांच्या ठिकाणी त्यांना होणाऱ्या विकारांचा व त्या त्या ठिकाणी होणाऱ्या आगमांचा यथायोग्य आढळ झाला, अव्यये वेगळी ओळखता यावीत, त्यासाठी केलेल्या खुणा डोळ्यांना दिसल्या, वर्णसिद्धीचे म्हणजे जोडाक्षरे बनविण्याचे व शब्दसिद्धीचे म्हणजे उपसर्ग-प्रत्ययांचे व संधिसमासांचे सर्व नियम पाळलेले दिसले, की लेखक-वाचकाच्या तारा जुळतात. सुजाण वाचकाला लेखकाने लिहिलेल्या शब्दांमधील अर्थ समजतो, इतकेच नाही, तर त्याच्या मनातील अभिप्राय उकलत जातो, झरत जातो आणि तो त्या लेखनातल्या शब्दाशब्दाला दाद देऊ लागतो ! त्याला समानधर्मा भेटल्याचा आनंद होतो. ते वाचन त्याच्यासाठी केवळ वाचन राहत नाही, तर एक सुरेल बंदिश ऐकल्याचा तो अनुभव असतो. त्याउलट अशुद्धलेखन सुजाण वाचकाच्या डोळ्यांना खुपते. याचाच अर्थ असा, की शब्दाच्या प्रमाण दृश्य रूपापासून झालेले विचलन मनामध्ये नोंदविले जाते व जलद वाचनाला या विचलनाचा अडथळा होतो.

सध्याच्या लेखनविषयक नियमांमुळे व मुख्यतः त्याबाहेरचे जुने नियम दंडाई ठरविल्यामुळे आम्ही वाचक वर उल्लेखिलेल्या आनंदाला कायमचे मुकत आहोत. त्या शास्त्राची जाणच नवीन पिढीतून आम्ही घालवून टाकली आहे. सगळ्यांना शास्त्रीय संगीत गाता येत नाही, येणारही नाही; पण म्हणून शास्त्रीय संगीत ही शाखाच सुलभीकरणाच्या नावाखाली किंवा लोकसंगीत हेच खरे संगीत, अशासारखे कारण सांगून नष्ट करावयाची काय? ज्यांना ते शिकण्याची इच्छा आहे किंवा भविष्यकाळी होऊ शकते, त्यांच्यासाठी ते दरवाजे कायमचे बंद करावयाचे काय? तसे करण्याचा अधिकार आपल्याला आहे काय?

उच्चारानुसारी लेखनाचे समर्थक लेखनविषयक नियम सुचविताना वास्तव परिस्थिती काय आहे, ते स्वतःचे डोळे उघडून पाहणार, की पश्चिमेकडचे भाषवैज्ञानिक त्यांना जेवढे दाखवितात तेवढेच पाहणार हा माझ्यासारख्यांपुढे प्रश्न आहे.

इंग्लिश भाषेमध्ये समान उच्चाराच्या पण वेगळ्या अर्थाच्या शब्दांचे spelling वेगळे करण्याची शिस्त आहे. Sun–Son, Right–Write, Rite, Know–No, By–Buy, Sole–Soul, Their–There असे वाटेल तेवढे शब्द दाखविता येतील. असे वेगळे spelling करण्याचा उद्देश डोळ्यांना त्या त्या शब्दाचा निश्चितार्थ कळावा, संदर्भासाठी सारखे मागे जावे लागू नये, वाक्याचा अर्थ समजण्यासाठी त्यांतील प्रत्येक शब्द वाचावा लागू नये, वेचक शब्द वाचून काम भागावे, त्या आकृतींना अर्थ प्राप्त व्हावा, एवढाच

आहे, असे मी मानतो. वाचकाची सोय व्हावी, हा त्याच्या मागचा विचार आहे. (पाहा: 'शुद्धलेखन कशासाठी? वाचकांच्या सोयीसाठी!' **रुचि**, फेब्रुवारी ९५) एकच शब्द एकदा नाम व एकदा क्रियापद म्हणून वापरावयाचा झाल्यास त्याचे spelling सुद्धा बदलून घेण्याचा इंग्रजीचा प्रघात आहे. आम्ही मात्र 'नांव' आणि 'नाव' असे लिहून त्या त्या शब्दाचा निश्चितार्थ नजरेला दाखवीत होतो, ते शास्त्रशुद्धतेच्या नावावर अमान्य केले आहे. 'मला खाऊ दे' व 'मला खाऊ दे' ही दोन वाक्ये अगदी वेगळा अर्थ डोळ्यांना दाखवितात. अशा डोळ्यांना समजणाऱ्या खुणा जणू काही आवाजाच्या चढउताराचे काम करतात - संदर्भ निर्माण करतात. मराठीतल्या ऱ्हस्वदीर्घांच्या खुणा, बिंदुचिन्ह spelling बदलण्याचे कार्य करतात, ही गोष्ट भाषावैज्ञानिकांना का बरे दिसत नाही? ती त्यांच्या नजरेला आणून देण्यासाठी आम्ही आणखी काय करावयाला पाहिजे?

**मोहनीभवन, बारलिंगे मार्ग, धरमपेठ, नागपूर - ४४० ०१०.**

●●●

**महामराठी**

महाराष्ट्र बँक ही मराठी आणि हिंदी यांचा आपल्या व्यवहारात वापर करण्यात पुढे आहे हे सर्वांना माहीत आहेच. बँकेच्या एका शाखेत आढळलेले काही सूचनाफलक पाहण्याजोगे आहेत.

अनिवासी सामान्न खाते

विनिमय प्रेक्षण

सर्व ग्राहकांनी विनंती की त्यांनी त्यांची रोख रककम भरणा करण्यापुर्वी संबंधीत अधिकारी / विषेश सहाय्यक यांच्याकडे नोंद करुन घेवून मगच निर्देशित कॅशियर कडे द्यावी व सहकार्य करावे.

अधोरेखित शब्दांमध्ये पुढील बदल अनुक्रमे करायला पहिजेत हे जाणत्यांना सांगायला नकोच : सामान्य, प्रेषण, आपली (their), करण्यापूर्वी, संबंधित, विशेष, सहायक (तो जे देतो ते साहाय्य, सहाय किंवा सहायक म्हणजे मदतीचा हात. पुढे करणारा, असहाय म्हणजे ज्याला कुणी सहायक मिळालेला नाही असा, क हा 'स्वार्थी' प्रत्यय), करून (किंवा करून), घेऊन, निर्देशित (concerned म्हणजे संबंधित, निर्देशित म्हणजे indicated), रोखापाल (कॅशियर एक वेळ चालेल म्हणा), कडे जोडून लिहिलेले, व ('द्यावी व' ऐवजी 'देऊन' मराठी वळणाचे, 'व' 'and oblige' या इंग्रजी वळणाचे).

यातले कोणते बदल तुमच्या लक्षात मूळ वाचता वाचता आले होते?

**पुस्तकपरीक्षण**

# भाषा शिकवण्याचा एक धाडसी प्रयोग

**परीक्षणलेखिका : उषा रानडे**

(परीक्षित पुस्तक : Marathi For Beginners : An Intensive Course in Spoken Marathi – Dr. Bhalachandra Namade. प्रकाशक – श्री बाबा भांड / साकेत प्रकाशन, औरंगाबाद, १९९४, पृष्ठे १०३ किं. ५० रु.)

या पुस्तकाचे लेखक श्री. भालचंद्र नेमाडे यांनी हे पुस्तक इंग्रजी जाणणारे विद्यार्थी डोळ्यांसमोर ठेवून लिहिले आहे. याचा अर्थ इंग्रजीचे – रोमन लिपीचे – ज्ञान असणाऱ्या कोणाही अमराठी भाषकाला या पुस्तकाचा उपयोग करता येईल.

लहान मुले भाषा शिकतात ती अनुकरणाने, त्यांना सुरुवातीच्या काळात वाचन–लेखनाची जरुरी वाटत नाही. तरी ती बोलू शकतात. हाच दृष्टिकोन लेखकाने पत्करला आहे. विद्यार्थ्यांना सुरुवातीलाच लिपीचे ज्ञान करून न देता संभाषणाची पद्धत वापरून भाषा शिकवावी, असे त्यांचे मत आहे. शिक्षकांनी ती शिकवताना येणाऱ्या गोष्टी शिकवायच्या, यासाठी एकूण सदतीस धडे दिलेले आहेत. शेवटी दोन परिशिष्टे दिली आहेत. तेथे ऱ्हस्व, दीर्घ, उच्चारांच्या खुणा, अर्धी व्यंजने, जोडाक्षरे यांची माहिती दिली आहे. विद्यार्थ्यांना शेवटच्या धड्याच्या आसपास नागरी लिपीचा परिचय करून द्यावा. लिपिशिक्षणाने भाषाध्यापनाला सुरुवात करू नये, असे लेखकाचे मत आहे. सुरुवातीपासून मराठीचे व्याकरण, नियम, अपवाद, भाषेतील प्रादेशिक व सामाजिक फरक हे लेखकाने हेतुतः टाळलेले आहेत; कारण मर्यादित वेळेत विद्यार्थ्यांना व्यवहारापुरते मराठी भाषेचे ज्ञान व्हावे, हा लेखकाचा मर्यादित उद्देश आहे. धड्यांच्या शेवटी सरावा (ड्रिल) साठी काही शब्द वा क्रियापदे दिली आहेत.

लेखकाचा वरील दृष्टिकोन ध्यानात घेतला, तर शिक्षकाची जबाबदारी फारच मोठी आहे, असे म्हणावे लागते. लिपी, व्याकरण, प्रादेशिक वैशिष्ट्ये विचारात न घेता भाषा शिकवायची म्हटले, तर याच निकषावर धड्यांची छाननी करावी लागेल. शिवाय प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे महाराष्ट्रात आल्यावर ही भाषा विद्यार्थ्यांच्या उपयोगी पडणार आहे. तेव्हा खरे म्हणजे, विद्यार्थ्यांना प्रमाण मराठी शिकवणे योग्य ठरेल, असा निष्कर्ष निघतो. आता आपण प्रत्यक्ष धड्यांकडे वळू.

१) ज्या वेळी लिपी शिकवायची नसेल, तेव्हा शिक्षकाने भाषेतील शब्दांच्या उच्चारांबाबत विशेष जागरूक असावयास हवे. लिपीचा विद्यार्थ्यांना परिचय असेल, तर कदाचित आपण नियम किंवा अपवाद यांचे स्पष्टीकरण करताना लिपीचा वापर करू शकू. पण जेव्हा लिपी येत नसेल व तरीही नियम, अपवाद, वेगवेगळी रूपे शिकवायची असतील, तर त्या दृष्टीनेच धड्यातील शब्दांची रूपे हवीत. उदा., मराठीत c (च), č (च), j (ज), ǰ (ज), š (श, ष) यांच्या उच्चारांत फरक आहे. पण लिपीत मात्र एकच चिन्ह वापरले आहे. अशा वेळी तालव्य व दन्तमूलीय उच्चार केव्हा, का करायचा, हे विद्यार्थ्यांना सांगण्यासाठी नेमकी पद्धत व प्रमाण भाषा न वापरल्याने धड्यात संदिग्धता आढळते.

उदा. – पान ५४ वर पान ८६

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| Masculine | | | ambyance | kelince | bhajance |
| Sg | pl | | | | |
| Səsa | Səse | (ससा, सशे) | आंब्यांचे | केळींचे | भाज्यांचे |
| raja | raje | (राजा, राजे) | | | |

पान ९०

| | | |
|---|---|---|
| səkalce | səndhyakalce | duparce |
| सकाळचे | संध्याकाळचे | दुपारचे |

प्रमाण मराठीत ससा पासून ससे असे अनेकवचन होईल. माझ्या उच्चारात म्हणजे प्रमाण मराठीत राजे (raje) असे अनेकवचन उच्चारले जाते. तसेच आंब्याचे, सकाळचे इत्यादी उदाहरणांत (ce) हा उच्चार येईल. तेव्हा लेखकाने इतरत्र दोन, दोन रूपे देण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच, येथेही दोन्ही उच्चार द्यायला हवे होते, ते दिले नाहीत. पैसा या शब्दाचे अनेकवचन pəise (पैशे) (पान ८६) उच्चारले जात नाही. म्हणून इथे लेखकाने प्रमाण मराठी भाषा वापरलेली दिसत नाही. निदान सरावासाठी दिलेल्या शब्दांत तरी दोन उच्चार द्यायला हवे होते. पण कदाचित ती प्रादेशिक वैशिष्ट्ये ठरतील, म्हणून लेखकाने एकच उच्चार दिला आहे, की काय? हे समजत नाही. या च (c c) च्या उच्चारासाठी केवळ अशाच उच्चाराचा अंतर्भाव केलेले शब्द वापरून एक स्वतंत्र धडा करता आला असता. उदा.,

| | | | |
|---|---|---|---|
| cəmca | car | चमचा | चार |
| cəndra | caku | चंद्र | चाकू |
| kac | čimni | काच | चिमणी |
| kaca | čendu | काचा | चेंडू |





अनुक्रमणिका

या रचनेमुळे विद्यार्थ्यांना सराव करताना हा फरक सहज ध्यानात आला असता.

२) पान ७८ वर शब्दसंग्रहात दोन शब्द आहेत.

Vocatives very commonly used.

∂re/re : for friends and persons of low status प्रमाण मराठीत 'रे' या अर्थाने वापरलेला माझ्या ऐकिवात नाही. बोलीभाषेत नाही, कदाचित वाङ्मयात घेऊ शकेल, तसेच ∂ge/∂g∂ (अगे/अग) exclusively for women of equal or low status. 'अगे' चा वापरही प्रमाण मराठी बोलीत नाही. कोकणातील मराठीत असेल. प्रमाण मराठी बोलीत कर-करेन, करीन, बोल-बोलेन, बोलीन अशी रूपे होतात. तीही दिली असती, तर चालले असते. इतरत्र इतर क्रियापदांची अशी दोन-दोन रूपे दिली आहेत.

३) धड्यातील लेखन उच्चाराप्रमाणे झालेले नाही. उदा., 'नऊ' या संख्येवरून n∂uva, n∂vua असे दोन्ही उच्चार दिले आहेत; पण 'चार' या संख्येचे बाबतीत c∂utha दिला आहे; पण c∂vtha म्हटले नाही. पाचशे याचा पाश्शे (passe) असा उच्चार दिला नाही. चव्वेचाळीस याचा चवरेचाळीस दिला आहे. चव्वेचाळीस (c∂vvecalis) हाही द्यायला हवा होता. म्हणूनच लिपी शिकवायची नसेल, तर मराठी भाषा शिकवताना उच्चाराच्या बाबतीतली जागरूकता शिक्षकाने दाखवलीच पाहिजे. इथे शिक्षक हाच एकमेव आधार या विद्यार्थ्यांना आहे. कारण लिपी किंवा व्याकरण न शिकता केवळ स्मरणशक्ती व सराव यावर भर आहे. या दृष्टीने या पुस्तकात ही त्रुटी जाणवते.

हॉटेल, डॉक्टर, इत्यादी इंग्रजी शब्दातील 'ऑ' च्या उच्चारासाठी '∂' वापरला आहे. पण पान २७ वर dakt∂r (डाक्टर) असे लेखन केले आहे. पान ३७ वर sv∂ch (स्वछ) पान ४९ वर dukh (दुख) असे लिखाण आहे. तेही svaccha, dukkh∂. असे हवे होते. धडा तेवीसमध्ये –

1) simple past tense 2) Instrumental – no suffix हे सर्व एका पाठात आले आहे. त्यामुळे विद्यार्थ्यांचा गोंधळ उडेल. त्याऐवजी ते दोनही पाठ स्वतंत्र हवे होते.

उदा. –

| | | |
|---|---|---|
| ये – आलो | प्र. | पु. |
| आलास | द्वि. | पु |
| आला | तृ. | पु |

याच पद्धतीने जा गेलो, बोल, खा, इत्यादी क्रियापदे सरावासाठी हवी होती.

४) मुद्रणदोष तर असंख्य आहेत. पुस्तकात त्यांची दुरुस्तीही कोठे दिली नाही.

उदा. thamb (थांब) ऐवजी ठांब (पान११) sigret (सिग्रेत) (पान३५)पान ५० masculine noun sing ऐवजी feminine noun sing. हवे.

विद्यार्थ्यांना लिपी उशिरा शिकवायची आहे. त्या दृष्टीने हा प्रयत्न नवा असला, तरी तो धाडसाचा वाटतो. कारण धड्यातील शब्दसंग्रह अपुरा आहे. केवळ विद्यार्थ्यांच्या स्मरणशक्तीवर भर दिलेला आहे. शब्दसंग्रहाच्या दृष्टीने पोस्ट ऑफिस, औषधे, शाळा, महाविद्यालय, पोशाख, पुस्तके, ग्रंथालय या क्षेत्रांचा शब्दसंग्रहात समावेश केलेला नाही. या दृष्टीने धड्याच्या मजकुरात फरक करावा लागेल. एकूण लिपी न शिकवता विद्यार्थ्याला भाषा शिकवणे मराठीच्या बाबतीत तरी धाडसाचे काम वाटते, म्हणूनच धड्यांची फेररचना केली, तरच हा प्रयोग काहीसा सफल होईल, हे नमूद करावेसे वाटते.

भाषाविज्ञान विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे - ४११ ००६.

## कानी पडलेला संवाद : समिक्षक कसा असावा?

‘माझ्या नव्या पुस्तकाची आवृत्ती नुकतीच संपली.’
‘बरीच लवकर संपली म्हणायची ! नवीन आवृत्तीची छपाई?’
‘लवकरच सुरू होईल.’
‘छान !’
‘वाचकांची पुस्तक आवडल्याबद्दल इतकी पत्रं आली म्हणता, “परिक्षणंही आली ....’
‘ ......... ’
‘काही परिक्षणांचा प्रतिकूल सूर लागला आहे.’
‘काय म्हणणं आहे त्यांचं?’
‘काय असायचं हो? वाचकांची पसंती महत्त्वाची. समिक्षक हे असलेच.’
‘ ........... ’
‘काय हो, त्या अमुक तुमच्या परिचयाच्या आहेत ना?’
‘आहेत की, चांगल्याच परिचयाच्या आहेत. काय? कशासाठी?’
‘त्यांना माझ्या पुस्तकाबद्दल लिहायला जरा सुचवा ना !’
‘सुचवून बघतो. पण त्या अनुकूल लिहितील याचा काय भरवंसा?’
‘माझं कुठं तसं म्हणणं आहे? परिक्षण वस्तुनिष्ठ असलं म्हणजे झालं.’
‘म्हणजे अनुकूल?’
‘..... ....... ..... ..... ’

# मराठीतील भाषाविषयक लेखन : १९९५

('भाषा आणि जीवन'च्या वर्षारंभीच्या पहिल्या अंकात त्याआधीच्या वर्षात प्रसिद्ध झालेल्या भाषाविषयक लेखनाची सूची प्रसिद्ध करण्याची प्रथा सुरुवातीपासून आम्ही पाळत आलो आहोत. ही सूची एखाद-दुसऱ्या व्यक्तीने केलेली असल्यामुळे ती परिपूर्ण असणे शक्य नाही. पण ती परिपूर्ण करण्यासाठी प्रयत्न मात्र केले जातात. या सूचीमध्ये काही लेखनाचा निर्देश झालेला नाही, असे लक्षात येताच, वाचकांनी जर त्या नोंदी आमच्याकडे पाठवल्या, तर या सूचीची पुरवणी म्हणून आम्ही त्या पुढील अंकात जरूर प्रसिद्ध करू. तरी वाचकांनी अशा नोंद जरूर पाठवाव्यात, अशी त्यांना विनंती आहे.-- **संपादक**)

अकलूजकर विद्युल्लेखा/शब्दसृष्टी, ईश्वर आणि रूमी ( धन परक्याचे)/भाषा आणि जीवन, पुणे/१३:१ हिवाळा १९९५/पृ.३४.

अडोणी दा.ल./भारतीय अर्थविचाराची पूर्वपीठिका (पुनर्भेट)/भाषा आणि जीवन, पुणे/१३:४ दिवाळी १९९५/पृ.३८.

आचार्य मा. ना./ भाषण रूढीच्या जवळ जाणारा मुक्तपद्यात्मक अनुवाद (पुस्तक परीक्षण)/ परीक्षित पुस्तक- गीतार्थदर्शन, अनुवादक आणि विवेचक-कृष्ण श्री. अर्जुन-वाडकर, आनंदाश्रम संस्था, पुणे १९९५/भाषा आणि जीवन, पुणे/१३:३ पावसाळा १९९५/पृ. ३९.

आचार्य मा.ना. / संतसाहित्यातील कथनसरणी / भाषा आणि जीवन, पुणे/१३:२ उन्हाळा १९९५/पृ.४

आपटे माधवी/ मराठी भाषावैज्ञानिक लेखनातला महत्त्वाचा टप्पा (पुस्तक परीक्षण)/ परीक्षित पुस्तक आधुनिक भाषाविज्ञान, सिद्धांत आणि उपयोजन, ले. मिलिंद स. मालशे, प्रकाशक, लोकवाङ्मय गृह, मुंबई, फेब्रुवारी १९९५/ भाषा आणि जीवन, पुणे/१३:४ दिवाळी १९९५/ पृ.१००

आवळीकर पंडित/ ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव, काही निरीक्षणे (ग्रंथपरीक्षण) /भाषा आणि जीवन, पुणे/१३:२ उन्हाळा १९९५/पृ.५१.

कळमकर य.शं./ आधुनिक भाषाविज्ञान, सिद्धान्त आणि उपयोजन (ग्रंथपरीक्षण)/ परीक्षित पुस्तक : आधुनिक भाषाविज्ञान, सिद्धान्त आणि उपयोजन, ले. मिलिंद स.

मालशे, प्रका.-लोकवाङ्मय गृह,मुंबई, प्रथमावृत्ती १९९५/नवभारत, वाई/डिसेंबर १९९५/पृ.५५

कानडे मु.श्री/ तुकारामांची शब्दसृष्टी : काही विशेष/ आमची श्रीवाणी धुळे/ २:२ जानेवारी १९९५/पृ. ८६

कुलकर्णी रंगनाथ/ प्रयोगजीवी कला आणि भाषाव्यवहार (दखलपात्र)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१ हिवाळा १९९५/ पृ.५०

केळकर अशोक रा./ दुसरा डोळा केव्हा उघडणार ? (संपादकीय)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१ हिवाळा १९९५ /पृ. १

केळकर अशोक रा./ नॉस्टॅल्जिया : एक कमी दाबाचा टापू (संपादकीय)/ भाषा आणि जीवन,पुणे/१३:३ पावसाळा १९९५/पृ.१.

कोल्हटकर माधवी/ नाळ काही तुटेना (पुनर्भेट)/ भाषा आणि जीवन, पुणे/१३:१ हिवाळा १९९५/ पृ. ३९.

खैरे विश्वनाथ/ मऱ्हाट, कानड, कन्नड/ नवभारत, वाई/ ४८:१२ सप्टेंबर १९९५/ पृ. ७.

गुंडी नीलिमा / भाषिक चिन्हांचा काव्यात्म उपयोग (ज्याची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन, पुणे / १३.१, हिवाळा १९९५ / पृ. ३१.

गुंडी निलिमा/ शब्दांच्या गावा जावे (भाषानिरीक्षण)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/ पृ. १६.

घारे दीपक/ अक्षरजुळणी आणि मुद्रणपद्धती/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/पृ. ३९.

घारे दीपक/ देवनागरी मुद्रणकला/ भाषा आणि जीवन, पुणे/१३:४, दिवाळी १९९५/पृ. ३५.

घारे दीपक/ भाषा: गणिताची आणि साहित्याची/ ललित, मुंबई, दिवाळी १९९५ /पृ. ११६.

घारे दीपक/मिथक : जनसामान्यांचा सहजोद्गार/ रुची, मुंबई/ एप्रिल १९९५.

घारे दीपक/ मुद्रणप्रत आणि मुद्रणसूचना/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:३, पावसाळा १९९५/ पृ.१०.

जोगळेकर गं. ना./ झापडबंद दृष्टिकोन नको/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१, हिवाळा १९९५/ पृ. १६.

जोशी श्रीपाद/ नावीन्य आणि प्रावीण्य (भाषानिरीक्षण)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१, हिवाळा १९९५/ पृ.१६.

टिळक नानासाहेब/ नाविक हाल (दखलपात्र)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, हिवाळा १९९५/ पृ.२०.

ठाले पाटील, कौतिकराव/ फुले- आंबेडकरांचा पराभव आपण केला आहे !/ रुची,

मुंबई/ मे १९९५/ पृ. ३.

दिवाण कुंदर/ ज्ञानदेवीतील एक शब्द/ नवभारत, वाई/ ४८:१२ सप्टेंबर १९९५ / पृ.२८.

देव वसंत/ तेंडुलकर हिंदीत (अनुवाद : हवेसे आणि नकोसे)/ (मूळ हिंदी लेखाचे ललितच्या प्रतिनिधीने केलेले भाषान्तर)/ ललित, मुंबई/ दिवाळी १९९५/ पृ.८४

देव विजया/आजचे वास्तव (ज्याची त्याची प्रचीती)/भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/ पृ.१८

देशपांडे निशिगंध/भाषिक व्यवहारातील सलणारे काटेकुटे (साद आणि प्रतिसाद)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१,हिवाळा १९९५/पृ.५३.

परांजपे प्र.ना./ पन्नासावा अंक (संपादकीय)/ भाषा आणि जीवन. पुणे/ १३:४.दिवाळी १९९५/ पृ.१

पाटील झुंबरलाल/'गोतावळा' कादंबरीची भाषाशैली/ आमची श्रीवाणी,धुळे/ २:३, मार्च १९९५/ पृ.४०.

पाठक प्र.वि./ चर्चासत्रामध्ये संशोधनपर लेखांचे वाचन कसे करावे आणि कसे करू नये/भाषा आणि जीवन, पुणे/१३:१, हिवाळा १९९५/पृ.४४.

पुंडलिक शैलेश सदाशिव/ अर्थनिर्धारणाची प्रक्रिया आणि भाषाविज्ञान/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/पृ. २३

पुंडलिक शैलेश सदाशिव/ ज्ञाननिष्पत्ती, अर्थनिर्धारण आणि भाषाविज्ञान/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:३, पावसाळा १९९५/ पृ. १८.

पुंडे दत्तात्रय/ 'भाषांतरातील सर्जकता '- काही प्रतिक्रिया (साद आणि प्रतिसाद) भाषा आणि जीवन, पुणे/ १३:३, पावसाळा १९९५ / पृ.३५

बडवे नीति/व्हॅलन्स थिअरी : धारणाक्षमता विचार/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:४, दिवाळी १९९५/पृ. १०

बर्वे श्रीराम गो./ चित्पावनी भाषा : एक चिकित्सा (दखलपात्र)/ भाषा आणि जीवन/ १३: ४, दिवाळी १९९५ /पृ.८९.

बागुल एकनाथ/ राष्ट्रपतींचे पुस्तक (भाषांतराच्या निमित्ताने)/ साहित्यसूची. पुणे/ जुलै १९९५/ पृ. ३२

बेलवलकर सुमन/ भाषा : घरची आणि दारची/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:४, दिवाळी १९९५/पृ. ८१

बोबडे सुहासकुमार/ म्हणे, मराठी माणसाची अस्मिता/ रुची, मुंबई/ १९९५/ पृ.७

भागवत दुर्गा/ पूर्वजांचे शब्द ... आपल्या भाषेत ( अनुवादः हवेसे आणि नकोसे) / ललित, मुंबई/दिवाळी १९९५ / पृ. ८२

भागवत वा.बा./ भाषेसंबंधी निरुक्तातील काही विचार / भाषा आणि जीवन, पुणे/१३:३,पावसाळा १९९५/.४

भावे ह. अ./ मराठी-इंग्रजी शब्दकोश/ वरदा बुक्स/ सरिता प्रकाशन, पुणे १६

भावे ह. अ./ विस्तारित शब्दरत्नाकर/ वरदा बुक्स,सरिता प्रकाशन, पुणे १६

मराठे सुधाकर/ दोन ऑस्ट्रेलियन आदिम कविता ( धन परक्याचे ) / भाषा आणि जीवन, पुणे/१३:१, दिवाळी १९९५/पृ. ३८

मंचरकर रत्नाकर बापूराव/ प्रस्तावना : सिंधी मराठी कोशाची/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:४, दिवाळी १९९५ / पृ. ९१

माने वसुधा/ पांडुतात्या, बंडुनाना आणि 'मी' (ज्यांची त्याची प्रचीती) / भाषा आणि जीवन, पुणे/ १३:३, पावसाळा १९९५/ पृ. ३७

माने वसुधा/ संपूर्ण बाळकरामबद्दल/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:१, हिवाळा १९९५/ पृ. ५१

मालशे मिलिंद स./ आत्मचरित्र आणि कथनमीमांसा/ नवभारत , वाई/ ४९: १-२, ऑक्टो.नोव्हें. १९९५/पृ. ३५

मालशे मिलिंद स./ आधुनिक भाषाविज्ञान, सिद्धांन्त आणि उपयोजना/ प्रका. लोकवाङ्मय गृह, मुंबई/ १९९५/ पृष्ठसंख्या- २६५ किं. १०० रु.

मेदककर प्रकाश/ भाषान्तरातील नवनिर्मितीचे स्थान व स्वरूप/ अनुष्टुभ/ मार्च-एप्रिल १९९५/पृ. ३०

मेहता अनिल/ मला मराठी पुस्तकं इतर भाषात न्यायची आहेत ( अनुवाद : हवेसे आणि नकोसे)/ ललित मुंबई/ दिवाळी १९९५ / पृ.८८

मोहनी दिवाकर/ मराठीची लेखनपद्धती आणि शुद्धलेखन/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२,उन्हाळा १९९५/ पृ.४०

मोहनी दिवाकर पुरुषोत्तम/ शुद्धलेखन कशासाठी ? वाचकांच्या सोयीसाठी !/ रुची, मुंबई/ फेब्रुवारी १९९५/पृ. ८

मोहिते शरदिनी/ नात बोलते हे निमित्तं/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/ पृ. ३१

रणसुभे सूर्यनारायण/ साहित्यानुवाद आणि मी/ साहित्यसूची , पुणे /मे १९९५/ पृ. ५३

राईलकर मनोहर/ गण, गणवृत्त, गणनाशास्त्र, गणित व संगणक/ भाषा आणि जीवन, पुणे / १३:१, हिवाळा १९९५/ पृ.४

राईलकर मनोहर/ भाषेच्या अध्यापनातील काही प्रयोग (ज्याची त्याची प्रचीती)/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:४, दिवाळी १९९५ / पृ. ९७

रेगे मेघश्याम पुंडलिक/ मराठी वैचारिक साहित्याचे स्वरूप : कालचे, आजचे, आणि उद्याचे/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:३, पावसाळा १९९५/ पृ. २७

वालावलकर य. ना. (सं.) / समानार्थी आणि विरुद्धार्थी शब्दकोश/ वरदा बुक्स-सरिता प्रकाशन, पुणे/

शहा मृणालिनी/ संपादकीय / भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/ पृ. १

सहस्रबुद्धे वर्षा/ लहान आणि मोठे/ भाषा आणि जीवन , पुणे/ १३:१, हिवाळा १९९५/ पृ. ३२

साठे वि. ना./ मराठीचा मान राखा आणि इंग्लिशचे थैमान रोखा/ भाषा आणि जीवन, पुणे/ १३:२, उन्हाळा १९९५/ पृ. ४४

सामंत सत्त्वशीला/ मराठी नसे आमुची मायबोली, तरी आज ती राजभाषा असे!/ रुची, मुंबई/ जानेवारी १९९५ / पृ. ३

सामंत सत्त्वशीला/ मला उत्तर हवंय्/ भाषा आणि जीवन/ १३:१,हिवाळा १९९५/ पृ. १६

सामंत सत्त्वशीला / श्री. के.क्षीं.चा भाषाविवेक/ महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे/ अंक क्र. २७४, जुलै १९९५/ पृ. ९

सुर्वे नारायण/ सरदार जाफरी यांची मुंबई ( अनुवाद : हवेसे आणि नकोसे )/ ललित, मुंबई/ दिवाळी १९९५/ पृ. ८८.

❐

ज्याला कोणतीच परभाषा येत नाही त्याला स्वभाषा येत नाही. योहान व्हुल्फ्गांग फॉन ग्योटे (१७४९-१८३२), माक्सिमेन उंट रेफ्लेक्सिओनेन



अनुक्रमणिका

# पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

' मराठी अभ्यास परिषद पत्रिका ' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्यासंबंधीचे निवेदन, वृत्तपत्र आणि पुस्तके नोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी ( केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४ यांना अनुसरून

**१. प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

**२. प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक : जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर मध्ये.

**३. मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** मृणालिनी शहा, भारतीय, १ शीतल अपार्टमेंट्स्, ४६।४ एरंडवणे, पुणे ४११ ००४

**४. मुद्रणस्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ, पुणे - २

**५. प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता:** मृणालिनी शहा, भारतीय, चिटणीस, मराठी अभ्यास परिषद, पत्ता कलम ३ प्रमाणे.

**६. संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** कल्याण काळे, भारतीय, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.

**७. पत्रिकेच्या मालकाचे नाव, पत्ता, :** एकंदर भांडवलाच्या एक टक्क्याहून अधिक हिश्शाचे अधिकार किंवा भागधारक असल्यास त्यांची नावे व पत्ते :

मराठी अभ्यास परिषद, द्वारा : अशोक रा. केळकर. ७ धनंजय सोसायटी, ७५९/ ८३ शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

मी मृणालिनी शहा असे प्रतिज्ञापूर्वक सांगते, की वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

पुणे : ३० मार्च १९९६

**मृणालिनी शहा,**
**प्रकाशक**

❐

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डर कूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.